अर्पण माझी कलाकृती ही गुलाब आणि बकुळीला
ज्या बकुळीनें ज्या गुलाबानें रिता कलश हा सजवीला

—अमर

****

# रसिकाप्रति

प्रिय रसिका,

माझं जीवन ज्यानं जवळूनहि पाहिलं आहे त्यालाहि हें ठाऊक आहे कीं, मी एक सरळ नि साधा सामान्य माणूस आहें. असं म्हणवून घेण्यांत विषाद वा अभिमान वाटण्यासारखं, वा गर्वानं फुगण्यासारखं कांहींच नाहीं. पण म्हणूनच मला म्हणायचं आहे तें हें कीं, हा सामान्य माणसाच्या हातून निर्माण झालेला कवितासंग्रह आहे; आणि तरीहि महाराष्ट्रानं या कवितांचं खूपच कौतुक केलं. इतकं कीं शेवटीं मलाहि त्याचं कोडं पडलं. वाटलं, मी एक सामान्य माणूस. माझ्या कविताहि मग सामान्यच. तेव्हां माझ्या कवितांचं कौतुक आणि लाड महाराष्ट्रांतल्या रसिक जनसागरानं इतकं करावं तें कां ?

विरोधी टीका आली. पण ती थोडी, अगदीं थोडी आणि तीहि मला मार्गदर्शक ठरणारी अशी नाहीं. एक टीकाकार माझ्यावर तुटून पडतात, मी जन्मानं केवळ मुसलमान आहें म्हणून तर कांहींना माझी साम्यवादी पिंडप्रकृति डाचते म्हणून. मीं त्यांतल्या एकाला विचारलं कीं, तुम्हीं माझ्या किती कविता वाचल्या ? उत्तर काय मिळालं, ठाऊक आहे ? ते म्हणाले, " तुमच्या कविता वाचायला हव्यातच कशाला ? त्या ठरलेल्याच असायच्या मुळीं. "

एकदां प्रा. वेडेकरांनीं एका काव्यविषयक लेखांत माझा थोडा गौरव केला बस्स् तेवढंच कारण पुरें झालं एका हिंदुत्वनिष्ठ साहित्यिकाला. माझ्यावर नि प्रा. वेडेकरांवर ते असे कांहीं भडकले, कीं बोलून सोय नाहीं. 'मियाँभाई' काय, 'अमरमिय्याँ' काय, काय हवं तें ते लिहून गेले.

नि त्याचंहि कारण मला त्यानंतर उमगलं. स्वातंत्र्य मिळतांक्षणींच

सौदेबाजीच्या राजकारणातून जातीयवादाचा डोंब उसळणार हें लक्षात येतांच त्या अनुषंगानं लिहिलेल्या—

" हिंदी संघराज्याच्या जनआत्म्या तूं घेई प्रणाम "
" रात्र आहे वैऱ्याची जागा रहा "
" गांधीजींच्या बलिदानांतुन हाक आली ऐका "

या नि यांसारख्या एकामागोमाग एक जातीयवादावर प्रहार करणाऱ्या कविता मीं लिहिल्या, आणि या कवितांमुळंच मला जातीयवाद्यांच्या शिव्या खाव्या लागल्या. आणि याच कवितांचं जनतेकडून एवढंच नव्हे तर प्रा. न. र. फाटक, वीर वामनराव जोशी आणि म. म. द. वा. पोतदार ह्यांच्यासारख्या महाराष्ट्रांतल्या अनेक विद्वान् रसिक मर्मज्ञ पंडितांकडून स्वागत झालं.

विशाल मानवी जीवनाकडे मी एक सामान्य सुसंस्कृत व जबाबदार माणूस म्हणूनच पाहात आलों असल्याकारणानं सामान्य माणसांच्या आशाआकांक्षांचं प्रतिबिंब माझ्या कवनांत पडणं अपरिहार्य होतं असं मला वाटतं.

पण मला वाटतं तेंच खरं असं समजून चालणं हें अल्प सत्य आहे, पूर्ण सत्य नाहीं. पूर्ण सत्य समजून घेण्यासाठीं इतरांनाहि काय वाटतं हें समजून घेणं जरूर आहे.

होय. इतरांनीं, महाराष्ट्रांतल्या हजारों लाखों लोकांनीं यांतील बऱ्याच कविता वाचल्या, ऐकल्या, गळ्यांतहि रुळवून घेतल्या, पण सगळ्या कविता एकमेकींचा हात धरून एकसमयावच्छेदेंकरून या संग्रहाच्या निमित्तानेंच पुढें येत आहेत. त्यांतल्या काळ्या-गोऱ्या, उजव्या-डाव्या ह्या आतां दिसतील, त्या सर्वांमागील कवीच्या पिंडप्रकृतीचा मागोवाहि रसिकजनांना व टीका-कारांना घेतां येईल.

रसिक जनताजनार्दनाच्या व टीकाकारांच्या निकोप बुद्धिवादी भूमिकेंतून कवितेवरील होणाऱ्या टीकेमुळें झालें तर माझ्यांतील दोषच दूर होतील व माझ्या हातून महाराष्ट्र शारदेच्या परंपरेला पुढं नेणारीच कविता निर्माण होईल, अशी मला दृढ आशा आहे.

या कवितासंग्रहासाठीं आचार्य अत्रे यांना मीं प्रस्तावना लिहिण्यासाठीं विनविलं. आणि...आणि त्यांनीं 'कलशपूजन' केलं इतकंच नव्हें तर हा

' कलश ' मराठी वाचकांच्या हातीं ठेवण्याचं भाग्य आपल्याला लाभलं असं म्हणून स्वतःला धन्य मानून घेतलं. खरं म्हणजे हा त्यांच्या मनाचा कितीतरी थोर असा मोठेपणा आहे, नाहीं का ? मी तर त्यांच्या ' कलशपूजनानें ' प्रथम क्षणभर गांगरलों, बावरलोच गेलों. आणि नंतर भानावर येतांच त्याचा अर्थ मला उमगला, तो असा. " शाहिरा, तूं ज्यांचा वारस आहेस, त्या मराठी कवींची परंपरा मोठी आहे. जिवांत जीव असेतोंवर ती पराकाष्ठेनें राख. लिहीत राहा, गात राहा. विझूं नकोस, विझवूं नकोस. पेटव, धुजव; रजव, रिझव; हटव, हटूं नकोस; विशाल मानवतावादाची कास सोडूं नकोस." कलशपूजनाच्या निमित्तानं याच जबाबदारीची जाणीव त्यांनीं मला करून दिलेली आहे. त्यांचे आभार मानणं शुद्ध वेडेपणा होईल व तो मी करीतहि नाहीं. पण या कलशपूजनासाठीं त्यांनीं केलेलं वाचन, चर्चा, वैचारिक मंथन मी गेलीं दोन वर्षे पाहात होतों. अतिशय परिश्रमानं नि मोठ्या जबाबदारीनं त्यांनीं हें कलशपूजन केलेलं आहे हें आपणहि ओळखालच. नाहीं का ? मला धन्य धन्य असं वाटलं.

माझे फार दिवसांचे स्नेही श्री. अनंतराव कुलकर्णी यांनीं हा ' कलश ' वाचकांच्या हातीं ठेवण्याचं कार्य कांहीं धंदेवाईक दृष्टीनं घेतलेलं नाहीं. केवळ हौसेनं, प्रेमानंच त्यांनीं हें काम हातीं घेतलं. हें पुस्तकाच्या वेगळ्या ठेवणीवरून सहज लक्षांत येण्यासारखं आहे. मात्र त्यांचे आभार मानून मी त्यांच्या माझ्या मैत्रीला औपचारिकतेचा ओरखडा पडूं देणार नाहीं. तसेच माझे नवीन चित्रकार मित्र श्री. साठे यांचे मनापासून आभार मानून जमलेल्या नव्या मैत्रीची गांठहि पक्की केल्याशिवाय राहणार नाहीं.

आनंद मुद्रणालयाचे श्री. जोशी यांचा माझा नवा स्नेह; त्यांनीं या पुस्तकाच्या सुबक छपाईबद्दल जी विशेष आस्था व कलाकुसर दाखविली त्याबद्दल त्यांचे मनःपूर्वक आभार.

प्रिय रसिका, आतां तुझी पाळी. तूंच आपल्या या शाहिराकडून महाराष्ट्र शारदेची सेवा अधिकाधिक घडून येण्यासाठीं त्याला मुक्तकंठानं आशीर्वाद दे.

२६ सप्टेंबर १९५८ —अमर शेख

# कलश-पूजन

दहा वर्षांपूर्वीची गोष्ट असेल. रात्रीची वेळ होती. कोठलें तरी व्याख्यान आटोपून मी रस्त्यानें चाललों होतों. एवढ्यांत एक तारस्वर सभोंवतालचें वातावरण सुरीप्रमाणें कापीत कानावर आदळला. अंगांतलें रक्त गोठल्या-सारखें क्षणभर वाटलें. मी थांबलों. चौकशी केली. तेव्हां समजलें कीं, अमर शेख ह्यांच्या काव्यगायनाचा कार्यक्रम जवळ कोठेंतरी चालू होता. अमर शेख ह्यांचें नांव पुष्कळ दिवसांपासून ऐकत होतों. पण त्यांना मीं पाहिलें नव्हतें, त्यांचें काव्य वाचलें नव्हतें नि त्यांचें गायनहि ऐकलें नव्हतें. अमर शेख ही काय शक्ति आहे ह्याची मला तोंपर्यंत कल्पना नव्हती.

त्यांच्या आवाजाचा शोध घेत घेत मी पुढें गेलों. पण गर्दीमुळें वाट अडली, म्हणून तेथेंच थांबलों. अमर शेख ह्यांची आकृति दिसणें शक्यच नव्हतें. पण त्यांचा खणखणीत पोलादी आवाज साऱ्या वातावरणांत थैमान घालून राहिला होता.

> " उघड नेत्र तो तिसरा भयंकर
> लाले लाल अंगार !
> ऐतखाउचें कर निर्दालन
> घेइ रुद्र अवतार ! "

माझ्या सर्वांगावर सरकन शहारा उठला. मस्तक सुन्न झालें. मुठी नकळत आपोआप वळल्या. अंगामध्यें साक्षात् रुद्र संचारावा अशा विलक्षण त्वेषानें नि आवेशानें अमर शेख ह्यांच्या मुखामधून त्यांच्या काव्याचा तो ज्वलन्त अंगार भडकत होता

" घेई आता ही एकजुटीची मशाल
उचल निशाण ! "

हो अखेरची ओळ कानावर पडताच पंधरावीस हजार कामगार श्रोत्यांनी टाळ्यांचा प्रचंड कडकडाट केला, आणि त्या कडकडाटातून

" राजा कुणबि हरे राम
रामराम राजा कुणबि हरे राम "

हा त्या गाण्याच्या पालुपदाचा जयघोष वाद्याच्या गजरांत नि साथीदारांच्या जोडस्वरांत सर्वत्र घुमूं लागला. श्रोतेहि देहभान विसरून टाळ्यांचा ताल देत गुणगुणूं लागले, ' रामराम राजा कुणबि हरे राम ! '

तो एक अविस्मरणीय अनुभव होता. त्यापूर्वी मीं अनेक कवींची काव्यें नि अनेक शाहीरांचे पोवाडे ऐकले असतील. पण कुणातहि म्हणून जीव आढळला नाहीं. कुठें धग नाहीं, रग नाहीं, कीं आग नाहीं. कुठें धुंदी नाहीं कीं बेहोषी नाहीं. पण अमर शेख म्हणजे धग, रग, आग, धुंदी आणि बेहोषी ह्यांची जिवंत बेरीज. एखादा लढवय्या तळहातावर शिर घेऊन जसा लढतो तसे अमर शेख आपलें काव्य गातात. हा जो ठसा त्या रात्रीं पहिल्यानें माझ्या मनावर उमटला तो आजतागायत कायम आहे.

अमर शेख हे कवि आहेत हें सांगण्याची जरुरी नाहीं. त्यांना पाहिलें कीं, ते कविच असले पाहिजेत ह्याची अगदीं खात्री होते. अष्टौप्रहर त्यांच्या डोक्यांत अन् डोळ्यांत काव्याची धुंदी चढलेली असते. त्यांना ' शुद्धी ' वर मीं कधीं पाहिलेंच नाहीं. एखाद्या कारखान्याच्या धुराड्यांतून धूर अन् ठिणग्या ह्यांचा लोट जसा वर उफाळत असतो, त्याप्रमाणें काव्याचा अंगार सदैव त्यांच्या शरीरांतून आणि वृत्तीमधून धुमसत असतो.

स्वतःच्या काव्याबद्दलहि त्यांनीं तेंच ' हद्गत ' सांगितलें आहे.

" होय, तोच आहे अंगार
आग ओकणें मजला प्यार
बाग आगिची फुलवावी
उर्दे आगलें उजाडें
सगळें वाईट जाळावें

आतां नाहीं हा मरणार
जीवन प्यालेला अंगार
येइल काळ कराया वार
याच्यावरती करीन वार
होय तोच आहे अंगार
नाहीं हो आतां विझणार ! ”

सोव्हिएट क्रान्तीचा उद्गाता मायकोव्हस्की ह्याची काव्याबद्दलची हीच भूमिका ाहे. कलावंत हा नवसमाज निर्मितीसाठीं लढणारा झुंजार सैनिक आहे. ाला उद्देशून तो म्हणतो—

“ ए, चाललास काय हळूहळू ?
घे, अनंतांत उडी !
दे भिरकावून तुझें गाणें
बाँब गोळ्यासारखें !
उडवून टाक ते साठे
जुन्या सामानाचे
कर स्फोटावर स्फोट
स्फोटावर स्फोट
चाल झपाझप
शीळ वाजवीत
गाणें गात
तुझ्या जिभेखालीं बघ
शब्दांचा केवढा
थैमान चाललाय ! ”

अगदीं हाच स्फोट आणि हाच गडगडाट अमर शेख ह्यांच्या शब्दाशब्दांत तुम्हांला ऐकूं येईल. त्यांची एकेक ओळ म्हणजे बंदुकीची फैर आहे. तोफेच्या तोंडांतून बाहेर पडणाऱ्या लाल रसरशीत गोळ्यासारखे त्यांचे जळजळीत शब्द एकामागून एक बाहेर पडत असतात. मग तें गाणें मातृभूमीच्या अभिमानाचें असो नाहींतर साम्राज्यवाद्यांना दिलेल्या आव्हानाचें असो. आपल्या लढाऊ बाण्याचा त्यांना कधींहि विसर पडत नाहीं.

'संयुक्त महाराष्ट्र' चें गाणें म्हणत असतांना महाराष्ट्राच्या शत्रूंना ते छातीठोकपणें बजावतात कीं,

> सह्याद्री सातपुडाही
> गर्जतसे पर्वतराजी
> घाला घण आमुच्या छातीवर
> अन् पहा मराठी बाणा !
> ह्या पर्वतराजी कसल्या ?
> करवतीच तापविलेल्या
> महाराष्ट्राभंवतीं पसरल्या
> अरिसेना ज्यांनीं चिरल्या
> ही परंपरा घेऊन मिरवितो
> आमुचा शिवबा तान्हा !

महाराष्ट्रामधला एकेक पर्वत म्हणजे शत्रूला चिरणारी साक्षात् करवतच आहे असली प्रखर आणि उद्दाम कल्पना दिवाणखान्यांत बसून कविता करणाऱ्या कवीला सुचणें सर्वस्वीं अशक्य आहे.

गोमंतकांतील पोर्तुगीज साम्राज्यशाहीवर चाल करून जातांना अमर शेख ह्यांच्या काव्यामधल्या शब्दांच्या अंगांत कमा लढाऊ त्वेष आणि आवेश संचारलेला आहे तें पाहण्यासारखें आहे.

> एक भारतिय जोंवर राहिल
> गुलामगिरिच्या बंधांत
> तोंवर कुठला घांस सुखाचा
> कोण असे आनंदांत ?
> फिरंगी साम्राज्याचे मिळवूं
> धुळींत उरले कोट खडे
> वेंचुनि काढा मत्त पोर्तुगिज
> मुळासकट अन् चला पुढें !
> व्हारे पुढें अन् चला पुढें !

अमर शेख हे काय आहेत अन् कोण आहेत हें समजून घेतलें पाहिजे, म्हणजे त्यांच्या काव्याचें स्वरूप असें कां ह्याचा नीट बोध होईल अमर शेख हे शाहीर आहेत ही गोष्ट विसरतां कामा नये. महाराष्ट्रांत कविता रचणाऱ्यांच्या तीन जाति पडतील. कवि, लावणीकार अन् शाहीर. जनतेचें मनोरंजन करणें हें कवींचें नि लावणीकारांचें कार्य असतें, तर जनतेला प्रेरणा देण्यासाठीं शाहीराचा अवतार असतो. कवि, लावणीकार गुंगवतात, मालवतात नि विझवतात. शाहीर चेतवतो, पालवतो नि पेटवतो. कवि नवा विचार देतो, नवे आकार दाखवतो, नाहीं असें नाहीं. पण ऐकणाराला त्यामुळें फार झालें तर रवंथ करण्याची इच्छा होते; आणि लावणीकार जास्तींत जास्त विकारांच्या विरोळ्यांना शरीरांतून वळवळ करावयाला लावतो. पण शाहीराचे शब्द कानावर पडले कीं, वारुळांतून फुंफाट करीत बाहेर पडणाऱ्या नागाप्रमाणें किंवा करवंदीच्या जाळींतून डरकाळी फोडीत बाहेर पडणाऱ्या वाघाप्रमाणें, माणसाची अवस्था होते. शाहीराचे शब्द त्याचीं आंतडीं खेंचतात. त्याचें जिव्हार ठेंचतात. कवि आणि लावणीकार हे रिकामपणाचे सोबती आहेत. शाहीर हा दैनंदिन जीवनाच्या संग्रामामधला सांगाती आहे. कवि हा आपल्या खोलीचें दार बंद करून, अंथरुणावर उताणा पडून अन् आढ्याकडे डोळे लावून स्फूर्तीचा गोळा डोक्यावर धदकन् केव्हां पडेल ह्याची तासन् तास वाट पाहात बसतो. कोकिळेप्रमाणें वर्षांतून दोन महिनेच त्याला कंठ फुटतो. शाहीर हा एखाद्या कोंबड्यासारखा आहे. घराच्या पडक्या भिंताडावर, शेताच्या कुंपणावर, नाहींतर कामगारांच्या चाळींच्या जिन्यावर बसून त्याला सकाळ दुपार बक्षीसपणें आरवावेंच लागतें.

महाराष्ट्रांतली शाहीरांची परंपरा फार जुनी आहे. तीनशें वर्षांपूर्वी स्वराज्याची मुहूर्तमेढ जेव्हां शिवछत्रपतींनीं ह्या महाराष्ट्रांत रोवली, तेव्हां पारतंत्र्याच्या काळनिद्रेंतून जनतेला जागृत करण्याचें कार्य त्या वेळच्या शूर शाहीरांनींच केलें. ' आम्ही शूर मर्द क्षत्री । नाहीं भिणार मरणाला ।' असे वीरश्रीनें थोथवलेले शूर मर्दांचे पोवाडे गाऊन त्यांनीं साऱ्या महाराष्ट्रांत मर्दुमकीची पेरणी केली. ' अरे, शेजेची बाईल द्यावी ।,पण इमान देऊं नये ।', अशा जळजळीत भाषेंत स्वातंत्र्यासाठीं घरादाराच्या होळ्या झाल्या तरी त्याची परवा करूं नये असा आवेश जनतेच्या अंतःकरणांत त्यांनींच निर्माण केला. शिव-

रायांनीं आणि शाहीरांनीं मिळवलेलें हें स्वराज्य पुढें दीडशें वर्षांनीं लावणीकारांनीं आणि त्यांना उदार आश्रय देणाऱ्या विलासी श्रीमंतांनीं घालविलें. इंग्रजांचा तोफखाना खंडाळ्याचा घाट चढून पुण्याच्या रोखानें येत असतांना जुन्या मंडईमध्यें ' गहिरी नजर असलेल्या नारीच्या कठिण कुचावर सुपारी ' फोडण्यात अन् ' अविवनांत केलेल्या कुरघोडीच्या ' गोड गोड आठवणी सांगण्यात आमचे मराठी लावणीकार गुंग होऊन गेलेले होते. त्यानंतर अनेक वर्षे खंडित पडलेली महाराष्ट्रांतली ही शाहिरी परंपरा ह्या शतकाच्या प्रारंभीं पुन्हा सुरू झाली. सह्याद्रीच्या पठारावर उभे राहून लोकमान्य टिळक जेव्हां स्वराज्याच्या सिंहगर्जना करूं लागले, तेव्हा त्यांच्या त्या गर्जनेंत वीर सावरकरांनीं आणि कवि गोविंदांनीं आपला शाहिरी सूर मिळविला. शिवरामपंत परांजप्यांची गद्य शाहिरी आणि विनायकराव सावरकरांची पद्य शाहिरी ह्यांच्यात त्या वेळीं जणु कांहीं लढतच लागून राहिली. सावरकरांच्या नि गोविंदांच्या पोवाड्यांनीं आणि गाण्यांनीं सारा महाराष्ट्र जागा झाला. शाहीरांनीं केलेला हा अभूतपूर्व विक्रम महाराष्ट्राच्या इतिहासामध्यें सुवर्णाक्षरांनीं नमूद करून ठेवण्यासारखा आहे. शेवटीं, ब्रिटिश सरकारनें त्या शाहीराला दोन जन्मठेपींची शिक्षा देऊन काळ्या पाण्यावर पाठविलें. तेव्हां त्याचा आवाज बंद झाला.

तो काळ गेला. तो लढा संपला. पारतंत्र्य मावळलें. स्वातंत्र्य उगवलें. पण तें मधल्यामधें भांडवलदारांनीं गिळून टाकलें. राज्यकर्त्यांनीं जनतेशीं विश्वासघात केला. स्वातंत्र्याचा मलिदा श्रीमंतांनीं मटकावला, नि गरीब अन्नाला मोताद झाले. तेव्हां महाराष्ट्रांत समाजवादी शक्ति जाग्या होऊन गर्जना करूं लागल्या. पण भांडवलशाहीनें राज्यकर्त्यांशीं संगनमत करून बंदुकीच्या गोळ्यांनीं लोकशाहीचा खून केला नि महाराष्ट्राला द्विभाषिकाच्या खड्ड्यांत कोंबलें. त्यावरोवर तीन कोटि मराठी जनता एकदम खवळून उठली. संयुक्त महाराष्ट्राचा विराट् संघर्ष सुरू झाला, आणि सह्याद्रीच्या दऱ्याखोऱ्यांतून अमर शेखसारख्या शाहीरांची वाणी आणि डफ पुन्हा त्वेषानें कडकडूं लागले.

महाराष्ट्राच्या जीवनमरणाच्या ह्या लढ्यांत सर्वांच्या पुढें जाऊन एकट्या अमर शेखांनीं उडी मारावी आणि महाराष्ट्रांतल्या बाकीच्या कवींनीं ' पिपांत मेलेल्या उंदरांचे मुडदे हुंगीत घरांत बसावें हें पाहिलें म्हणजे महाराष्ट्रामधें

साहित्याचा आणि काव्याचा केवढा अधःपात झाला आहे हें कळून येतें. गेल्या तीस-पस्तीस वर्षांमधें ह्या देशामधें जे प्रचंड झगडे झाले आणि जीं क्रांतिकारक परिवर्तनें घडून आलीं त्यापासून आमचे लेखक आणि कवि एव-सारखे फटकून दूर राहिले. त्यामुळें तरुणपणांत झोंपी गेलेल्या आणि म्हातार-पणांत जागा झालेल्या रिप वॅन विंकलसारखी त्यांची स्थिति झाली आहे. नदीचें पात्र शंभर मैल दूर सरकलें आहे त्याचा ह्यांना पत्ता-नाहीं. हे लोक अजून आपले वाळवंटांतच हातपाय हलवीत बसले आहेत. ते महाराष्ट्रांत राहतात आणि मराठी भाषेंत बोलतात एवढेंच काय तें. पण मराठी जनता म्हणजे काय हें त्यांना माहिती नाहीं आणि ती जी भाषा बोलते ती ह्यांना समजत नाहीं. लेखक आणि जनता ह्याच्या विचारांच्या नि भावनेच्या दैनंदिन देवघेवींतून जें निर्माण होतें तें वाङ्मय हें ह्या विचाऱ्यांना माहीत नाहीं. त्यांना वाटतें कीं, आपण बंद केलेल्या खोलींत बसून मेलेल्या उंदरावर मुक्त-छंदामध्यें जी बडबड करतों तींच ' उपनिषदें ' होत!

ह्याच्या उलट अमर शेख अगदीं लहानपणापासून जीवनाचा झगडा प्राणपणानें लढताहेत. दुःख आणि दारिद्र्य त्यांच्या पाचवीला पुजलेलीं आहेत. त्यांचें सारें चरित्र कांहीं मला माहिती नाहीं. पण मोटार 'क्लीनर'च्या कामा-पासून त्यांनीं आपल्या आयुष्याला सुरुवात केली आहे. त्यांच्याच शब्दांत त्यांचें चरित्र ऐका :

' चरित्र माझें, चरित्र माझें
 जें अश्रूंच्या टोहीं भिजलें
स्वेदनदीच्या पुरांत फेकुनि
 रक्तसागरींही बुडविलें
तरीहि माझें चरित्र अजुनी
 नाहिं संपलें, नाहि संपलें !!
कारण त्याचें अगदीं साधें
 जीवनावरी माझी श्रद्धा
सत्यावरती असीम भक्ति
 हीच आहे दडली शक्ति
चरित्रास या तारायाची '

आयुष्यातील संकटांशीं टक्कर देतांना जीवनावरली त्यांची श्रद्धा कधींहि ओसरली नाहीं किंवा सत्यावरचा त्यांचा विश्वास कधीं आटला नाहीं. वार्शी-सारख्या वैराण आणि दुष्काळी प्रदेशांत त्यांचा जन्म झाला. ज्या नदीच्या कांठावर त्यांचें बालपण गेलें तिचें नांव मात्र 'पुष्पावती', पण तिच्या पात्रांत पाण्याच्या नांवानें ठणठणाट.

गोदेकांठी, कृष्णेकांठीं
द्राक्षाच्या आंब्याच्या बागा;
माझ्या पुष्पावतिच्या कांठीं
बाभळ, कडुनिंबाच्या रांगा !
महाराष्ट्राच्या दरीकपारिंत
राघू मैना कोकिळकूजन
बालेघाटी मात्र माझिया
व्हला पारवा करतो गायन !

अशा रीतीनें बाभळ-कडुलिंबाच्या संगतींत आणि होल्या-पारव्याच्या संगीतांत ह्या बालेघाटी शाहीराचें बाळपण गेलें. पण—

रुक्ष अशा ह्या माळावरती
महाराष्ट्रधर्माची ज्योती
थोर पंढरीची भागवती
धो धो जवळुन वहात होती !

पंढरीच्या वाळवंटामधून वहाणाऱ्या महाराष्ट्रधर्माच्या अथांग तीर्थांत प्रत्यक्ष अवगाहन करण्याचें भाग्य जरी त्यांना लाभलें नाहीं तरी त्याचे पवित्र तुषार आपल्या काव्यकलशांत वेळोवेळीं साठवून ठेवावयाला मात्र ते विसरले नाहींत, ह्यामुळें त्यांच्या भाषेची ठेवण उन्हातान्हांतून काम करणाऱ्या शेतकऱ्याच्या बाईप्रमाणें रांगडी आणि खेडवळ वाटली तरी तिच्या नसा-नसांतून मराठी बाणा आणि मराठी ठसका मुसमुसतो आहे हें लक्षांत आल्यावांचून राहात नाहीं.

डोळे आणि बुद्धि उघडी ठेवून जो स्वाभिमानी माणूस समाजांतील प्रतिकूल परिस्थितीशीं झगडतो त्याला हळूहळू आपल्या सामाजिक परिस्थितीचें

आकलन होऊं लागतें आणि त्याला आपल्या झगड्याचें स्वरूप उमगतें तसें अमर शेख हाचें झालें. समाजांतील श्रमजीवी वर्गाला अहर्निश पिळणाऱ्या आणि छळणाऱ्या राक्षसी भांडवलशाहीचा साक्षात्कार ज्या क्षणीं त्यांना झाला त्या क्षणीं त्या वर्गविग्रहांत आपली शाहिरी तलवार घेऊन ते शेतकऱ्यांच्या आणि *कामगारांच्या आघाडीवर दाखल झाले. अन् तेव्हांपासून त्यांच्या वाणीला* विलक्षण धार चढली आणि तिच्यांत निराळीच धग निर्माण झाली. त्यांच्या गळ्यांतून लकेर उसळली रे उसळली, कीं हजारों शेतकरी नि कामगार त्यांच्याभोंवतीं भराभर गोळा होऊं लागले.

हे धनिक कसाई त्याहुनिही अति नीच
निर्लज्ज करावी अधमकृती हानींच.
मिळवण्या नफा बाजारपेठ हवि त्यांना
*लष्करी योजना पेटविती युद्धांना!*

*　　*　　*

ओझ्यांनि कराच्या जीव जिकीरिस येतो
दुष्काळ अजगरागत पिच्छा पुरवितो;
अन् काळ्या बाजाराची काळी छाया
महागाई त्याची वहीण पसरवि माया.
मग उपासमारी, वेकारी, पिळणूक
*वर दडपशाहिचा नवा नवतीचा झोक!*

अशी आग भांडवलशाहीवर आणि साम्राज्यशाहीवर रोजच्या रोज उधळणाऱ्या आणि—

लढतां लढतां मंगल तारा लाल नभीं येणार
रवि नवतेजें लोकक्रांतिनें नटुन पुन्हा दिसणार !

असलीं लोकक्रांतीचीं भाकितें वर्तविणाऱ्या शाहीराला परकीय सरकार किती दिवस बाहेर मोकळें राहूं देणार ? थोड्याच दिवसांत अमर शेख तुरुंगाची वाट चालूं लागले. कारागृहाच्या,नरकांत अनन्वित यातनांचें हालाहल प्राशन करीत त्यांना महिनेच्या महिने काढावे लागले.

ह्या दंडावरच्या खुणा पहा निरखून
साखळदंडानें नेलेल्या बांधून
अंधारकोठडी दिली ओढण्या मोट
उध्वस्त करुनिया कुटुंब लाविली वाट !

कारागृहातील यमदूतांनीं त्यांचें सर्वांग रक्तबंबाळ केलें. पण त्यांची हिंमत हटली नाहीं, कीं गाणें थांबलें नाहीं. कारागृहाच्या गजावर ताल धरून ते शेवटपर्यंत गात होते आणि लढत होते. लढत होते नि गात होते.

वर्गीय लढ्याचें शस्त्र म्हणून अमर शेख आपलें काव्य रचतात नि गातात. त्यामुळें शेतकऱ्यांच्या आणि कामगारांच्या हृदयाचा ते अचूक ठाव घेतात. मायकोव्हस्कीच्या मतें कवीला दोन गोष्टींची जरुरी आहे. एक ही कीं, त्याच्या काव्यामागें सामाजिक ऊर्मि पाहिजे. आणि दुसरी ही कीं, आपण कोणत्या वर्गाचे प्रतिनिधि आहोंत ह्याची त्याला स्पष्ट जाणीव हवी, मग त्याला दुसऱ्या कोणत्याहि साधनांची जरुरी नाहीं. त्याला कागद नको, शाई नको, कुंचली नको कीं रंग नको.

The streets shall be our brushes
Our palettes shall be the squares.
रस्ते हेच आपल्या कुंचल्या होतील !
अन् चौक आपले फलक बनतील !

अमर शेख ह्यांच्या प्रत्येक शब्दाशब्दामधून सामाजिक ऊर्मि अन् वर्गजाणीव ह्यांचें दर्शन होतें. आजकालच्या पुष्कळशा पांढरपेशा कवींमधें नेमका त्याच गोष्टींचा अभाव जाणवतो. जुन्या काळीं समाजामधल्या धनिक आणि ऐतखाऊ वर्गांच्या आश्रयाखालीं काव्याचा विकास होत गेला. पण सामाजिक उत्क्रांतीमधें तो वर्ग जसा मागें पडला तशा त्याच्या आश्रयाखालीं निर्माण झालेल्या काव्याच्या परंपराहि आतां निर्जीव आणि निष्प्रभ पडल्या. पण पांढरपेशा कवींना ह्या गोष्टींची जाणीवहि नाहीं. समाजाकडे पाठ फिरवून ते खुशाल विलासाच्या, प्रेमाच्या आणि सृष्टिसौंदर्याच्या शिळ्या कढीला पुन्हा पुन्हा ऊत आणण्याचा अजून उद्योग करीत बसले आहेत. अशा कवींना उद्देशून मायकोव्हस्की म्हणतो—

Gentlemen Poets,
have you not tired
of pages,
palaces
love
and lilac blooms ?
If such as you
are the creators
then I spit upon all art.

सभ्य कवींनो,
अजून कंटाळा नाहीं आला
त्या राजदूतांचा
राजवाड्यांचा
प्रेमाचा
नि वासंतिक बहराचा ?
हीच जर तुमची
निर्मिती असेल
तर थूः साऱ्या कलेवर !

काव्याकडे बघण्याची अमर शेख ह्यांचीसुद्धा अगदीं हीच कल्पना आहे. फक्त वसंत ऋतूमधेंच कंठ उघडणाऱ्या ज्या विलासी कोकिळेला पारंपारिक कवींनीं आजपर्यंत आपली प्रतिभा शेंकडों वेळा बहाल केलेली आहे, तिला अमर शेख बजावून सांगतात—

कोकिळे, गाऊं नको तें गीत
जाळित सुटतें मानवहृदया
जें बेसुर संगीत !
भूक येइ पायांत माझि बघ,
होइ जिवाची तगमग तगमग
डमडम गोळी देइ धनिक जग
प्रतिकाराची शक्ति अमुची

जाईल गे मातींत,
कोकिळे गाऊं नको तें गीत !

उपाशी पोटांचा प्रखर झगडा जो जगांत चाललेला आहे, त्याचा विसर पाडणाऱ्या फसव्या संगीताच्या माधुर्याचा बडेजाव हवा कशाला ? साहित्याचा हेतु ' सत्य, शिव आणि सुंदर ' ह्याची निर्मिति करण्याचा आहे असें पंडीत सांगतात. त्यांना अमर शेख विचारतात कीं,—

फुलें उमललीं जिथें सर्वभर
पण अन्नाचा कण नच उपजे
जगूं कसा नुसत्या गंधावर ?

फुलांचा सुवास, पक्ष्यांचें संगीत आणि स्त्रियांचें प्रेम ह्यांची महती भक्तेदार कवि वारंवार गात असतात. पण त्यांचें महत्त्व कुणाला ? दोन प्रहरचा ज्यांचा प्रश्न सुटला आहे त्यांना. मध्यान्हीचा सूर्य माथ्यावर आला, पोटांत कावळे ओरडूं लागले, ओठांना कोरड पडली आणि श्रीमंतांच्या घरांतून पंचपक्वान्नांचा गंध येऊन जीव कासावीस होऊं लागला म्हणजे कुठलीं फुलें, कुठल्या कोकिळा नि कुठलीं चुंबनें ?

दो प्रहराचा महिमा भारी
तत्त्वज्ञानें पचवी सारीं
दुनियेमधल्या सत्याचें तें
रूप सत्य, शिव आणिक सुंदर !

अमर शेख हे ज्या वर्गाचे प्रतिनिधि आहेत त्या वर्गाच्या जीवनाचें अत्यंत रौद्र आणि भयानक दर्शन त्यांच्या काव्यामध्यें घडतें, जीवनाचा विसर त्यांना क्षणमात्र पडत नाहीं.

जीवना वगळुनी शब्द कोणता सांगा.

हा तर मुळीं त्यांचा सवाल आहे.

सुंदर तरुणीचें दर्शन झालें कीं, भांडवलशाही जगांतल्या कवीच्या तोंडाला पाणी सुटतें; आणि तो तिच्या प्रेमाची याचना जाहीरपणें आपल्या काव्यांमधून करूं लागतो. त्याची त्याला जशी लाज वाटत नाहीं तशी त्याचें तें काव्य वाचणाऱ्या वाचकांनाहि पण वाटत नाहीं.

लंपट ओलें वस्त्र होउनी
अंग अंग तव लिंपुन घ्यावें

येथपर्यंत कवीच्या वेशरमपणाची मजल जाते. वास्तविक सामान्य माणसांच्या सभ्य जनांत स्त्रियांच्याबद्दल उघडपणें असें कोणी बोलत नाहीं. पण भांडवलशाही काव्याच्या सृष्टींत सभ्यतेचे आणि संकोचाचे हे सर्व निर्बंध कवींनीं जणू काय झुगारुन दिलेले आढळतात. हा मक्ता त्यांना कोणीं दिला ?

सामान्य स्त्री तर राहूं द्याच पण अनीतीच्या कर्दमांत जिचें पाऊल रुतलें आहे अशा पतित युवतीला पाहून साम्यवादी विचाराच्या आमच्या या शाहीराला काय वाटतें तें पाहण्यासारखें आहे.

झुंझाराची तूं स्फूर्ती
मूर्ती प्रत्यक्ष कालिमातेची
पूर्ती वात्सल्याची
प्रेमळ पत्नीची
भगिनीची माया
प्रत्यक्ष मूर्तीमंत पवित्र निर्मिती
तूंच ती ब्रह्मयाची आदिमाया
मुग्धे, मुग्धे, बोल गे बोल
तुझिया सोनेरी शब्दा नाहीं मोल
कुठल्या कर्दमीं रुतले खोल
तुझे ते अनमोल बोल
मुग्धे, मुग्धे, बोल गे ।

दलिताबद्दल, दुःखिताबद्दल, पतिताबद्दल ज्याला सहानुभूति वाटत नाहीं किंवा आदर वाटत नाहीं तो कवि कसला ? आणि तो माणूस तरी कुठला ?

अमर शेख ह्यांची 'मुग्धेस' ही कविता वाचल्यानंतर मला मायकोव्हस्कीच्या 'पॅरिसियन' ह्या कवितेची सहज आठवण झाली. पॅरिसमधल्या एका विश्रांतिगृहामधल्या 'मूत्रालया'त काम करणाऱ्या एका तरुण स्त्रीवर त्यांनीं ही कविता केली आहे. अशी स्त्री हा कवितेचा विषय होऊं शकेल असा आजपर्यंत कोणाच्या डोक्यांत विचार तरी आला आहे काय ? पॅरिसमधल्या एका

विश्रांतिगृहांत गिन्हाइके दारू पितात आणि लघुशंका करावयाला त्या मूत्रालयांत जातात. तेथें ही स्त्री उभी असते. त्या गिन्हाइकांना साबण आणि टॉवेल देणें एवढेंच तिचें साधें काम असतें. गिन्हाइकानें हात नि तोंड धुतले कीं त्याच्या अंगावर ती अत्तराचे फवारे उडवते नि सुगंधी पावडर तोंडावर टाकते. चोवीस तास त्या सूर्यप्रकाश नसलेल्या कृत्रिम उजेडाच्या खोलींत काम करीत ती उभी असते. बाहेर पॅरिसच्या रस्त्यांत अंगावर रत्नजडित दागिने घालून, रेशमी वस्त्रें परिधान करून अन् आपल्या चेहऱ्यावर तारुण्याची रंगावट करून विलासी स्त्रिया हिंडत असतात, अन् ही तरुण स्त्री आपलें सारें तारुण्य ह्या 'मूत्रालयांत' घालवीत असते. तिच्या पायांत सुती मोजे असतात, तिच्या अंगावर एकहि दागिना नसतो आणि तिच्या चेहऱ्यावर क्षयरोगाचीं भेसूर चिन्हें दिसावयाला सुरवात झालेली असते. ह्या स्त्रीचें हें केविलवाणें दृश्य बघून मायकोव्हस्कीनें दोनच ओळींत जो निष्कर्ष काढला आहे तो किती हृदयद्रावक आहे पाहा :

> It's very difficult to be a
> Woman in Paris
> If a woman does'nt sell
> *herself, but works.*
>
> पॅरिसमधें स्त्रीचें जिणें फार कठिण आहे.
> तिला काम करावयाचें असेल
> अन् शरीरविक्रय करावयाचा नसेल तर--

ह्याला म्हणतात कवि, अन् ह्याला म्हणतात काव्य. पण असें काव्य सुचावयाला कवीच्या अंगीं मानवतेबद्दल अथांग प्रेम आणि श्रद्धा असावयाला हवी.

जीवनामधील प्रखर वास्तववादी चित्रें रंगवणाऱ्या साम्यवादी कवीला उत्तुंग कल्पनांच्या किंवा ध्येयांच्या स्वर्गांत उड्डाण करण्याचा प्रतिबंध असतो असें समजण्याचें मुळींच कारण नाहीं. सृष्टीमध्यें जी सर्वत्र जादू भरलेली आहे त्या जादूमधूनच काव्याचा उगम झालेला आहे. काव्यामधली ती जादू गेली कीं, मुळीं काव्यच संपलें. जीं ध्येयें वा ज्या कल्पना साध्य होण्यासारख्या

असून अद्याप साध्य झालेल्या नाहींत, त्यांच्याबद्दल जनतेच्या मनांत आकांक्षा निर्माण करणें हें कवींचें काम आहे. बेलेन्स्की जे म्हणतो कीं--

'Poetry is the idealisation of reality'

( काव्य हें वास्तवतेचें उदात्तीकरण आहे ) त्याचा अर्थ हाच आहे. ही कल्पना गॉर्कीनें जास्त स्पष्ट केलेली आहे. तो म्हणतो, 'Our art must rise above reality and raise man above it, without detaching him from it.' ( वास्तवाचा संबंध न तोडतां त्याच्या पातळीपासून कलेनें माणसांना घेऊन वर गेलें पाहिजे. )

'चांदोबा, चांदोबा, भागलास का?
निंबोणीच्या झाडावर बसलास का?
निंबोणीचें झाड करवंदी
मामाचा वाडा चिरेबंदी
मामाच्या वाड्यांत येऊन जा
तूपरोटी खाऊन जा!'

हें महाराष्ट्रांतील अत्यंत लोकप्रिय शिशु-गीत म्हणजे कल्पना आणि वास्तव ह्यांचा अत्यंत मनोज्ञ संगम होय. आभाळांत चालून चालून दमलेला चंद्र आपल्या मामाच्या वाड्याशेजारच्या निंबोणीच्या झाडावर विश्रांति घेत बसलेला पाहून लहान मुलाला साहजिकच त्याच्याबद्दल सहानुभूति वाटते. आणि म्हणून तें त्याला म्हणतें कीं, "इतक्या जवळ तूं ज्या अर्थी आला आहेस त्या अर्थी माझ्या मामाच्या वाड्यांत येऊन तूपरोटी खाऊन जा. म्हणजे तुझा थकवा जाईल अन् मग आभाळांत चालायला तुला तकवा येईल!" आभाळामधल्या चंद्राच्या किरणांतून खालीं सांडणारें अमृत प्राशन करून तूं आपली तहान भागव असें पृथ्वीवरल्या भुकेल्या माणसाला सांगण्यापेक्षा पृथ्वीवर खालीं उतरून आमच्या घरांतली तूपरोटी खाऊन जा असें आभाळांत चालून दमलेल्या चंद्राला सांगण्यांत कल्पनेचें अधिक काव्यमय वास्तवीकरण आहे हें कोणीहि कबूल करील.

जीवनाचा लढा लढतां लढतांहि अमर शेख ह्यांची प्रतिभा उद्यांचीं भव्य चित्रें रंगवीत बसलेली आहे.

हा महासारथी जवाहरही अपुला
या शांति-लढयाच्या आघाडीवर आला;
युद्धखोर गाडूं चल ये शांति-लढयांत
ही जिंकुं लढाई हातांत घालुनि हात
शांति-प्रीतीची सांगड घालुन कवनीं
मज वाटे गावें सुंदर सुंदर गाणीं !

जगांतील युद्धखोरांना आपण नष्ट करून टाकूं, विश्वशांति प्रस्थापित व अन् मग गळ्यांत गळा घालून आपण शांतीचीं आणि प्रीतीचीं सुंदर सुं गाणीं मनसोक्त गाऊं असें कवीनें आपल्या मैत्रिणीला जें प्रलोभन दाखव आहे तीं कांहीं केवळ कविकल्पना नाहीं. साऱ्या जगाचें ह्या एकाच ध्येयाव आज लक्ष्य खिळून राहिलेलें आहे.

आकाशांत जोंपर्यंत सूर्य व चंद्र प्रकाशत आहेत तोंपर्यंत 'मुंबई बेळगांवस संयुक्त महाराष्ट्र तुम्हांला मिळणार नाहीं !' असें आजचे उन्मत्त राज्यक तीन कोटि जनतेला आव्हान देत असतांना भारताच्या राजधानीमध्यें जाऊ 'जागा मराठा आम जमाना बदलेगा !' असा छाती फाडून अमर शेख ह्यांनं जो सव्वा वर्षापूर्वी टाहो फोडला तो काय महान् ध्येयाची प्रेरणा त्यांच्य रोमारोमांमधून संचारली असल्याखेरीज काय ? संयुक्त महाराष्ट्र समितीनें छप्पन्न सालच्या जुलै महिन्यांत लोकसभेच्या महाद्वारावर दोन हजार स्त्री-पुरु सत्याग्रहींचा जो मोर्चा नेला त्या मोर्चाच्या आघाडीला शाहीर अमर शेख हे आषाढामधल्या मेघाप्रमाणें गडगडत होते आणि त्यांच्या गळ्यांतून उचंबळणारे काव्य साक्षात् विद्युल्लतेप्रमाणें कडकडत होतें. अमर शेख ह्यांच्या अंगांत त्या वेळे जणू कांहीं साक्षात् महाराष्ट्रच संचारला होता. त्या वेळचा त्यांचा तो दैवी अवतार मी तरी कालत्रयीं विसरणार नाहीं. सतत दोन दिवस दिल्लीच्या रस्त्यांमधून 'जागा मराठा आम' ह्या अमर शेख ह्यांच्या आवाजाशिवाय दुसरा आवाज ऐकूं येत नव्हता. तो आवाज कानीं पडला कीं, दिल्लीच्या रस्त्यांतले स्त्री-पुरुष मंत्रमुग्ध होऊन अपक्ष्य लोचनांनीं अमर शेख ह्यांच्याकडे पाहात राहावयाचे. सतत चार चार तास पांच पांच तास अन् दोन दोन दिवस त्याच त्या तार सप्तकांत चढत्या आवाजानें गात राहावयाचें हा शाहिरी

सामर्थ्याचा अभूतपूर्व विक्रम आहे असें मी म्हणतों. दुसरा कोणी माणूस त्यांच्या जागीं असता तर उरी फुटून अन् रक्त ओकून रस्त्यात मरून पडला असता. दिल्लीचा सत्याग्रही मोर्चा बिर्ला मंदिरापासून दुपारीं एक वाजता सुरू झाला, तो लोकसभेच्या दारापाशीं सायंकाळीं सहा वाजतां संपला. अमर शेख यांचें पथक सर्वांच्या शेवटीं गर्जत येत होतें. त्या दिवशींचा त्यांचा पराक्रम संयुक्त महाराष्ट्राच्या इतिहासांत सुवर्णाक्षरांनीं लिहून ठेवण्यासारखा आहे. गेल्या तीनशें वर्षांतले सारे मराठी शाहीर जणु त्यांच्या गळ्यांत आणि डोळ्यांत येऊन बसले होते. श्रीशिवछत्रपति जर त्या वेळीं असते तर त्यांनीं अमर शेखना अक्षरशः आपल्या छातीवर उचलून धरलें असतें. आणि 'शाबास शाहीर!' अशी त्यांच्या पाठीवर थाप मारली असती.

'दो कवडीके मोल मराठा
विकनेको तैयार नहीं!'

ही ओळ त्यांच्या तोंडून जेव्हां निघाली तेव्हां सत्याग्रहींना पकडून मोटारींत कोंबणाऱ्या अनेक वृद्ध धीरा शिपायांनीं देहभान विसरून टाळ्या वाजवलेल्या मीं स्वतःच्या डोळ्यांनीं पाहिल्या आहेत. सहा वाजले. अंधार पडला. अमर शेख ह्यांचें शेवटचें पथक सत्याग्रह करून गात आणि गर्जत पोलिसांच्या मोटरींत चढलें. मोटर सुरू झाली. आणि हात उंच हवेंत फेकून अन् मान मागें फेकून 'जागा मराठा आम जमाना बदलेगा!' हें पालुपद तार-स्वरानें गाणारी अमर शेख ह्यांची मोटरीच्या मागच्या दारात उभी असलेली मूर्ति दिसेनाशी झाली. देशासाठीं आपलें सर्वस्व अर्पण करणाऱ्या शूर शाहिराचें ह्याच्यापेक्षा अधिक तेजस्वी स्वरूपात दर्शन होणें अशक्य आहे असें मला वाटतें.

अशा एका क्रांतिकारक शाहीराच्या काव्याचा 'कलश' आज मराठी वाचकांच्या हातीं ठेवण्याचें भाग्य मला लाभलें आहे. शाहीराचें काव्य छापून लोकांच्या हातीं ठेवणें म्हणजे एखाद्या महान् चित्रपटाच्या कथा आणि संवादांची पुस्तिका प्रेक्षकांच्या हातांत ठेवण्यासारखें आहे. ज्याचें वैभव ऐकण्यांत किंवा पाहण्यांत आहे, त्याचा वाचून मनावर कितीसा परिणाम होणार? पंडित टीकाकार अमर शेख ह्यांच्या ह्या छापील काव्यावर तुटून पडतील, म्हणतील, त्यांत वृत्ताचे दोष आहेत. व्याकरणाच्या चुका आहेत. शब्दांची ओढाताण आहे. अशा टीकाकारांना काय उत्तर द्यायचें? अमर

शेखनीं शालेय शिक्षणासाठीं प्राथमिक शाळेच्या पायरीला कमावसा तरी हात लावला. त्यांना व्याकरण न् वृत्त कुठून येणार? पण वृत्त आणि व्याकरण म्हणजे कांहीं काव्य नव्हे. काव्यांत जिवंतपणा लागतो, तृप्ति लागते, धुंदी लागते. मुंबईच्या गरीब कामगार विभागांत एका लहानशा खोलींत आपल्या वृद्ध मातेला, पत्नीला आणि बाळांना घेऊन दारिद्र्यांत जीवन कंठणारा अन् 'घट्ट ताक अन् ज्वारीभाकर' खाऊन 'एकच ढेकर' देणारा हा शाहीर हिमालयाच्या शिखरावर जाऊन पोहोंचलेल्या तेनसिंगाइतका आज तृप्त आणि धुंद आहे! म्हणून शत्रूच्या छातींत धडकी बसवणारे जिवंत नि ज्वलन्त काव्य तो आज लिहूं शकतो. गिरगांवांतल्या नि गांवदेवीवरच्या हवेशीर फ्लॅटमध्यें राहूनसुद्धां वैफल्याच्या भावनेनें अंतर्बाह्य सडलेले विद्वान् भाषाशास्त्री नि वैयाकरणी कविश्रेष्ठ जर—

संज्ञेवांचुन अशीच असते
संभोगाची हलक्या कसरत

अशींच मैथुन-काव्यें लिहिणार असतील तर त्यांच्या भाषेला अन् व्याकरणाला काय जाळायचें आहे? त्यांचें तें तसलें काव्य त्यांनाच लखलाभ असो.

शाहीराचें व्याकरण चुकलें असें म्हणणें म्हणजे जंगलांत गर्जना करणाऱ्या सिंहानें 'धैवत' बरोबर लावला नाहीं असें म्हणण्यासारखेंच आहे. (माझ्या माहितीचे पुण्यामधले एक विद्वान् प्राध्यापक आहेत. त्यांच्या प्रेमळ पत्नीनें त्यांना पत्र लिहितांना 'प्रिय' च्या ऐवजीं 'प्रीय' लिहिलें म्हणून त्यांनीं तिचा त्याग केला. ही गोष्ट ह्या संदर्भांत सहज आठवते.) शाहीराचें काव्य त्याच्याच तोंडून ऐकायचें असतें. घरांत बसून वाचायचें नसतें. हौदांत शांतपणें बसलेलें पाणी धबधब्यातून पडतांना दिसलें म्हणजे डोळे फिरतात. दुकानांत गरीबासारखा बसलेला दगडी कोळसा एंजिनच्या पोटांत पेटलेला पाहिला म्हणजे डोळे दिपतात. त्याप्रमाणें हजारों कामगारांच्या मेळाव्यांत मध्यभागीं उभे राहिलेले शाहीर अमर शेख जेव्हां छाती पुढें काढून, मान मागें वळवून आणि उजवा हात उंच हवेंत फेकून तारस्वरांत

जय महाराष्ट्र संयुक्त महाराष्ट्राच्या गाऊं गाना
गाऊं उंचावुनि माना
घेऊं तानावर ताना!

अशी ललकारी मारतात, त्या वेळीं त्यांच्या ह्या ' कलशा ' त केवढी आग अन् केवढा धवधवा साठलेला आहे ह्याचा एकाच वेळीं साक्षात्कार होईल !

' राजमार्ग '
संडास
२ जानेवारी १९५८

प्रल्हाद केशव अत्रे

## २. जन्मभूमि

( मेरि प्यारि जन्मभूमि –शैलेन्द्र )

जन्मभूमी–प्रिय माय जन्मभूमी
आकाश निळें नीलमणि धरति सुवर्णा
धंदेरि नद्यां वाहति भोंति हरित गालिचा
वायुमंद गीत-गंध उधळि दशदिशा
करि पुलकित क्षणक्षणास जीवन आशा.
माय जन्मभूमी अशी थोर जन्मभूमी
प्रिय मला ही माझी माय थोर जन्मभूमी ॥

विशाल भाल हिमगिरी अभिमान आम्हांला
भारतियांना
अर्पितसे भानु जगातें रश्मिची माला
सर्वां आधिं ज्याला
माय जन्मभूमि अशी थोर जन्मभूमी
प्रिय मलाही माझी माय थोर जन्मभूमी ॥

स्वर्ग आला भूवरती दास होउनी
रूप मुग्ध सिंधु सतत चरण चुंबुनी घेई धन्य मानुनी
जन्म धरतिवरती या धन्य आम्ही ते
पूजुं पूज्य मायभूही गाउनि गीतें
थोर जन्मभूमी अशी थोर जन्मभूमी–
प्रिय मला ही माझी माय थोर जन्मभूमी

****

# ३. नवसंगीत

रसलेल्या शब्दांनो या
या रे या गायाला या
तळमळ माझ्या हृदयाची
आर्त हाक स्वर बंधूंची
काय तुम्हां ऐकूं ये ना
तानावर उठती ताना ?
नादवाहकांनो या रे
यांना नटवुनि न्या रे
कामगार अन् शेतकरी
तसे तुम्ही जीवनांतरीं—
शब्द स्वरांना या माझ्या
जीवनांत आहे दर्जा.
गरुड-भरारी या मारूं
सोडूं वाऱ्यावर वारू.
घालुं गवसणी गगनाला
नित सोडूं नव तेजाला,
तेज न हें क्षण टिकणारें
काजवे न लुकलुकणारे
वीज नवी जी लवलवते
दावुं तिच्या नव तेजातें.
अवघ्या अवकाशा भरुनी
या उजळूं नवगीतांनीं.
तिन्ही काळ संचार करूं
अवघें जीवन साकारूं.
जुन्या सुंदराप्रत जाऊं
त्यांचेंही गाणें गाऊं.

त्या वाजतगाजत आणूं
त्याच्या अभिमाना वाणूं.
जपून तो ठेवा ठेवूं
उद्यां जगाला तो देऊं.
शोधूं सत्त्व तयामधुनी
गीत नवनवें गुंफोनी.
करूं ' उद्याचें ' स्वागत या
या शब्दांनो धांवत या.
तुमचें माझें हें गाणें
गाऊं या स्वप्राणानें.
शब्दराज ज्ञानेशाच्या—
वाटाड्या ये कवितेच्या
स्फूर्ति, प्रतिभेच्या ' कलशा '
मुक्या मानवाच्या मनिपा
सुंदरतेच्या सुस्वरूपा
जागृतीच्या नंदादीपा
कधीं तुतारी देहींची
भल्या पहाटे हांक तुझी
खड्बडीत महाराष्ट्र-रवा
सोड शब्द कृष्ण केशवा *
मायकोस्कीच्या शब्दा ये
नवोन्मेष रूपा ये घे
तान तुझी माझी नाहीं
अलग बरें का रे भाई
थोडासा दे शब्द झरा
ही फुलवाया अधिर धरा

---

* केशवसुत

वघ तानेच्या गर्भांत
चित्रें होतीं साकार
छोनुकुलीं वाळें इवलीं
देई त्यास पूर्णाकार
चार दोन तीं नाहितरे
जन्मतात लाखों चित्रें
धमाल गर्दी वध करिती
कुंठित होते अल्पमती
कां टाकूं त्या गुदमरुनीं
काय पाप केलें त्यांनीं ?
शब्द पुरुष तूं पोलादी
नाहीं मनानें तकलादी
अति कोमल भाव रसाचा
कुंभ खरोखर तूं साचा
पटे जगाला अनुभवितां
तुझ्या मनाची उदात्तता
तूं तो शब्द-पुरुष थोर
कोण बरोबरि करणार ?

*     *     *

भावकणांनीं थथथले
रक्त-फुलांनीं मन भरलें
घरव्यांतुनि मृदु मन निघतें
तुझें तुझ्या हातीं येतें,
हर्षोत्फुल्लच होवोनी
रक्त-फुलें तूं निरखोनी
फुलें वेचुनी श्यामधुनी
सुंदर माला गुंफोनी

रक्त-फुलांची ती माला
पोयाया अर्पायाला
ध्येयरूप शिवया दिमला
तूं सर्वांपुढती अपुला
अर्पुनि त्या धरणीं माला
धन्य मानि तूं स्वतःला
महान् शब्द-पुरुष जगतीं
अशी तुझी आहे ख्याती.

★ ★ ★

लढण्याची खुमखुमी मुला
दाविताेस त्यांतही कला
पिळला जाणार उठला
तूंच त्याचिया साथीला
पायधुळींतुनि दलितांच्या
यांधितोस आपुला मोर्चा
हल्ल्याआधीं स्फूर्तीचा
रस आणूनिया जो देतो.
शत्रूवर धिक्काराचा
स्वैर अग्निही वर्षवितो
पिळणूरे हबकुनि जाती
धैर्य तयांचें खचवीतो
रक्तवर्णि आकाशाच्या
गंगेंतुनि पोहत येतो
मानवतेच्या रान्या सुपुत्रां
दलितांच्या लढवय्या पुत्रां
या सर्वांना खुलवीतो
यश पुष्पें वर उधळीतो

आणि पुनः हिंमत देतो
पुढेंहि पण घेउनि जातो
तो तुजविण कोणी नाहीं
अवघें जग देइल ग्वाही.
जनशत्रूंचा तिटकारा—
तुझा मला ठाऊक पुरा—
परि मित्रांना कधिंपासून
जाऊं लागला तूं विसरून ?
जानि दोस्त मी तुझा असून
कां रे बसला सांग रसून ?
येशि न का तें बोल जरा
सृष्टीमधल्या शब्दवरा.
ये ना आतां तरि राजा
पूर्ण करी आशा माझ्या
कमी कधीं तुज लेखोनी
मनांत आलें खरडोनी
मांडुनि बाजारांत तुला
कधीं उधळलें सांग मला ?
कां करिसी कानाडोळा ?
कां दयडीसी ही वेळा ?
तुझ्या नि माझ्या मैत्रीला
सांग बरें का बाध आला ?
तूं शत्रु जन-शत्रूंचा
मीही हाडवैरी त्याचा
ढोंग न्याय अन् शांतीचे
बुरखे दांभिक सत्याचे
याच नखांनीं आजवरी
फाडुनि फेकुनि दिलें दुरी .

जीवनाकडे ओढ तुझी
तशीच रे आहे माझी.
दुःखांना वाचा फोडी
सदा तुझी माझी जोडी.

* * *

कां सत्य कथन करावया
भीति वाटते रे राया ?
कसली भीती दे सोडून
धास्ती सारी लाथाडून
सत्य आजवरचें होतें
होतें तें सारें कोतें
आजवर मनुजाची दृष्टी
कसली इवलीशी सृष्टी !
म्हणुनिच सत्यहि मनुजाचें
होतें तोळ्यामाशाचें
अमाप सत्य कधीं दिसलें
कंवरडें याचें बसलें.
जेव्हां सत्य कठोर दिसे
आश्चर्यहि शंकेंत वसे
प्रकृति साधारण ज्याची
छातिच दडपुन जायाची
कोत्या मानवदृष्टीला
नित ये कोडें वांच्याला
तुला मला तें कां कोडें
तूं मीं कां व्हावें वेडें
नव क्षितिजावर लालेलाल
सत्य सूर्य उधळितो गुलाल

नवा जोम त्यानें धरिला
आहे ठाऊक तुला मला
आणि आजचा माणुसही
मोठा चौकस हो भाई
म्हणुनिच सत्य कथायाला
प्रसंग बघ बाका आला
सत्य जगा सांगायाला
शब्दा चल ये गायाला
मी स्वर तुजविण लुळालुळा
अर्थानें पुरता आंधळा
तुजविण माझें जिणें नसे
अटल सत्य हें जगीं असे
तारेमाजी वीज जशी
शब्दामाजीं तान तशी
कां, हि रांगडी माझी तान
तिनेंच तूं झाला हैराण
छे, हें शक्यच नाहीं आज
तूंच दिली ना आजवर साथ ?
संकोचास्तव येशि न का ?
कां गोंधळशी मांग फुका ?
गर्गातुनि संकोच आला
प्रश्नच मग नाहीं उरला
ताठा धर्मच नाहिं तुझा
एकच धर्म तुझा माझा
ज्या जनतेनें जन्म दिला
कर्तव्यें हीं तुला मला—
दिली, तयांची फेड करूं
चल गीतांचा फेर धरूं



कर्तव्यक्षम प्रेमाची
हांक आहे निर्वाणीची
आले उद्यांच्या जगताचे
बघ स्वागत करण्या नेते

वृद्ध, तरुण अन् मुलें मुली
ही एकच गर्दी झाली
रक्तबिंदु शेवटचाही
धाया सजली सेनाही.
विलंब लावुं नको आतां
थके तानही अळवितां
तूं येतां ही थकली तान
होइल आनंदें बेभान
ती जीवन्-रस नवा पिऊन
पुरी तुझ्यांतच सामाऊन
फेर तुझ्यामगेंच धरून
गाइल स्वर वरचा लावून
ये आतां तूं धांवत ये
स्वरास या नवजीवन दे
मन कुसुमाचें घेउनि ये
रूप मात्र रुद्राचें घे
पूजुं ध्येय-मेरू प्यारा
फुलवूं जीवन-अंगारा
अंगारा गत नाच करूं
तांडवनृत्या फेर धरूं
अन् ह्या तांडवनृत्यांनीं
स्वच्छ करूं अवघी अवनी
तांडव होता संपून
जीवन-अमृत ओतून
नवकमलांची फुलवूं बाग
कल्याकळ्यांवर गाऊं राग
अमरत्वाचें गाऊं गीत
ये चल गाऊं नव-संगीत

****

## ४. शब्दांनो

शब्दांनो या रे धांवत स्वर्गांतूनी
येतांना आणा अमृत-कुंभ भरोनी
आणा तें जीवन-अमृत रसरसलेलें
नवबालकां करीं द्या भरभरूनी पेले
हें पहा उपाशी अर्धपोटि हें मूल
जन्मतांच होई निर्माल्य जणूं फूल
शब्दांनो, तुमचें जीवन ज्यांच्या हातीं
कां होऊं देतां त्याच जिवाची माती ?
जीवना वगळुनी शब्द कोणता सांगा
कां यमद्वारीं लाविलशा तुम्हीही रांगा ?
क्षय तुम्हांस होईल अभंग जीवन आहे
रे अटळ सत्य मी तुम्हांस सांगू का हें ?
उद्धार असे तुमचा या बाळाहातीं
या धांवत अमृत घेउनि बाळासाठीं

****

# ५. सिने-संगीत



[ सिनेमाच्या पडद्यावरून रात्रंदिवस नागव्या गाण्याचेच सूर कानीं पडूं लागले म्हणून उद्वेगानें निघालेले सूर ]

प्रीतीच्या चंदेरि नद्यांना आला आहे पूर
हें वाहत आहे गढ़ूळ पाणी पिऊं नका व्हा दूर ॥

हर्षे घाणींत लोळणारे
गाति नाचति म्हणती " या रे
वहाते गंगा हात धुवुनि घ्या
पवित्र गंगा-जल या प्या रे "
ताल धरी भैरवी नग्न-गीतांना देउनि सूर
हें वाहत आहे गढूळ पाणी पिऊं नका व्हा दूर ॥

आकाशीं तळपतो रुपाया
सर्व त्याची ही आहे माया
' त्या ' तेजानें चकाकते जळ
नाहिं नसे हो जळ हें निर्मळ
पूर नव्हे हा उठे चहुंकडे मृगजळ भस्मासूर
हें वाहत आहे गढूळ पाणी पिऊं नका व्हा दूर ॥

झळा लागुनी त्या रुपयाच्या
बंद पडे हो जीवन-वाचा
' चकाकतें सगळें नच सोनें '
पदोपदीं ये प्रत्यय त्याचा
काव्यानें चालविली आहे आपुली थट्टा क्रूर
हें वाहत आहे गढूळ पाणी पिऊं नका व्हा दूर ॥

येतां संस्कृति-भास्कर गगनीं
निर्मळ होइल अवघें पाणी
होऊं द्या काहिली जिवाची
आळवा नव-संस्कृतिचीं गाणीं
या ' मायावी ' दुनियेचा अन् कराच चकाचूर
हें वाहत आहे गढूळ पाणी पिऊं नका व्हा दूर ॥

****

## ६. कलावंत

कलावंत जीव अगदीं निर्जीव
निकामी बांडगूळ वाटतें कुणा
छंदी नि हट्टी भिकारसे चाळे
गटारी, घाणींत सदा जे लोळे
डोकें आभाळांत अधांतरीं पाय
येतां भूमीवर उलटेंचि जाय
कट्टुहि आहे सत्यहि तसें
सत्यहि तसें आणखीही आहे
संपूर्ण होईल याचाचि विकास
प्रत्यय येईल आगळा तुम्हांस
मेला माणूस जिवंत करील
हाच येडा तुम्हांमधील.

****

## ७. बेडकी आणि तरुणी

सरेरं जाहली पहा बेडकी
तारुण्यानें मुसमुसलेली
मस्तीनें धुंदीनें न्हाली
मारित जाई उड्या प्रीतिच्या

डुण् – डुण् – डुण् – डुण्
डुण् – डुण् – डुण् – डुण्
शोधित जाई प्रियकर अपुला
असेल कुठल्या डबक्यामाजीं

होइल डबक्याचेंच सरोवर
फुलेल दुनिया तिच्या प्रीतिची
तिथेंच डबक्याकांठीं पडली
नवी उमलली षोडश वर्षा

उमलण्याआधीं चुरगळलेली
मानवतेची महान् प्रतिमा
गालावरचें स्तनावरिलही
पहा कातडें घरंगळलेलें

करावयाला प्रियाराधन ?
मेलें जोबन मेलें तन-मन
घेउनि पडली आज घडीला
तरूण उरलें सुरलें स्त्रीधन

दोन आण्याला विकतें यौवन
डबक्याकांठीं अभिमानानें
यौवन कसलें 'हाड कातडें'
कुत्तरडें चघळित असलेलें.

*   *   *

आविष्कार नव लावण्याचा
पदोपदीं ये प्रत्यय त्याचा
बेडकीमधली म्हणे यौवन
मानव टांगा पाहित मरतो.

* * * *



मढें पुरावें मातींत
तसाच होतों राखेंत
पोखरते तें काळी कीड
कुठली चाईटाची चीड ?
ती माझी दृष्टी निर्भीड
तिथें दिसे मेले गोचीड
लाल जांभळट काळा रंग
कुठें दिसेना झालों दंग
धमक दरारा हिंमत ती
त्याची ही झाली माती
जेथें मेलें मन दडलें
धाय मोकलुन तें रडलें
डसे इंगळी चोंहिकडे
मेल्या मनिचें मढें रडे
हताश, दुःखांनीं तें चूर
भंवतालीं उठलें काहूर
कुठें तरी जाऊं या दूर
हीच सदा लागे हुरहूर
परंतु मग कोठें जावें
हेंच अचुक ना उमगावें
गोंधळ भंवतालीं सगळा
जगापासुनी मी अगळा
कुठें तरी भटकतों दूर
मी माझ्यापासुनि दूर
एकाचें तें जग वसतें
एकहि पण तेथें नसतें
म्हणति कुणी तें शून्य आहे
शून्यहि रे पण तें नोहे

'तो' धागा वरती पडला
आत्मसात् त्या मीं केला.
तें जीवन आतां आलें
पुरतें अमृत प्यालेलें.
आतां नाहीं हा मरणार
जीवन प्यालेला अंगार
वाइट तें सगळें जळणार
मागमूस नाहीं राहणार !
आहे आम्रीचा निर्धार
खोटा कोण कसा करणार ?
येइल काळ कराया वार
वारावरती करीन वार
होय तोच आहें अंगार
नाहीं हो आतां विझणार !

****

# .११. एक क्षण



बस् क्षणांत झाला प्रकार घडले न्यारे
मी बसलों हरवुन होतें नव्हतें सारें
सुख हरवण्यांत ही आहे मजला कळलें
मुखवटे गळुनि लौकिक स्वार्थाचे पडले
हरवलें तयाचें दुःख क्षिति नच कांहीं
हृद-सागरिं आनंदोर्मिच उसळत राही
या उर्मींवरती जीवन हें तरंगावें
अन् गीत अशा चिर-सौख्याचें मीं गावें......

° ° °

परि सौख्य असें कां सामान्यां लाभेल ?
शंकाही रास्त, पण क्षण सुखास बाधेल.



हिंदोल्यावरही प्रीतिच्याच झुलणारी
मजसवें प्रीतिची मारील भरारी
ती समान हेतू मनांत बाळगणारी
अन् समान ध्येयानें सळपत राहणारी
कार्याचें क्षेत्रहि माझें जिचें असेल
माझ्याच अपेक्षा घेउनि जी नाचेल

ती सळसळ धडपड हें यौवन जगण्याची
हें अमोल मीलन रूप असे गेल्याची
निःशब्द शांतता प्रीती-मीलनसमयीं
ती शांत नि शीतल तेवत राहिल समई
" तें अवघें मानव-जीवन-सूत्रच समई
समईद्वारें नव-जीवन जन्मा येई. "
तें मीलन उच्च प्रतीचें दोन जिवांचें
तेवत्या प्रकाशीं आशा फुलुनी नाचे
यीं रुजेल आनंदाचें दो-हृदयांचें
अन् होइल या माझ्या सार्थक जन्माचें.
मग तारा-मंडळ तिच्या गळ्यांतिल प्यावें
हळुवार खेळवित गीत शांतिचें गावें
तें तारा-मंडळ पुरें पुरें विकसोनी
मानवी फुलें तीं मानानें वाढोनी
तीं पूर्ण उमलतां जातिल समाज-गगनीं
लखलखाट होइल उजळतील ही अवनी

## कुठें आहे तें स्वप्न ?

हो हेंच स्वप्न मी घेउनि जन्मा आलों
ठेवितां पाय यौवनीं धन्य मी झालों
साकार कराया स्वप्न लागलें वेड—
इतकें कीं अन्नहि वाटेना मज गोड.
परि हाय ! उघडतां क्षणीं यौवनीं डोळे
अंधार गर्द, भोंवतीं भयानक जाळें
छेः ! जाळें कसलें दिसले गज तुरुंगाचे
अन् राज्य चाललें होतें यमदूतांचें.
अन् त्यांतच भोंतीं भेसुर ज्वाला दिसल्या
उमलत्या प्रीतिच्या होत्या चिता भडकल्या..

हें माझें यौवन छोनुकलेसें बाळ
अर्यातच त्या भोंतीहि आगडोंबाळ
ते अवघें यौवन आलें डबघाईला
त्यावरी होतसे चोहोंबाजुनें हला.

ते खटनट सारे चोर भांडवलवाले
जे फक्त नफ्यासाठीं चटावले गेले
ती संवयच साऱ्या धनिकांना जडलेली
बिन्-मेहनत जगणें निशा सदा चढलेली.

हासूं मी कसल्या शिव्या मला उमगेना
हा तिरस्कार मज स्वस्थ बसूं देईना.
बस् म्हणशिल याची झालि शिवी सुर्वात
धनिकांस शिव्याविण नाहीं याची बात
ए, खरे सांगु का तुला मनींचे बोल ?
ही प्रीत वाटली होति मलाही फोल.

जणुं मिरासदारी आहे धनिक वर्गाची
बेछूट चालते लूट तुझ्या स्वर्गाची
हें जीवन जेथें संपुष्टीं आलेलें
ओसाड आणखी जें भकास झालेलें
जन्मता हक्क ना आम्हां प्रेम करण्याचा
होताच हक्क तर धनिकास्तव मरण्याचा
बाजार गुरांचा तेथ कसाई येतो
अंगावर चर्बी मांस न्याहाळुन घेतो
चपला सांध्यावर भाकरिगत बांधोनी
अन् 'त्या' भाकरिची शपथ कधीं घेवोनी
सौदा करतो ढोरांची वॅगिन भरतो
विनधोकपणें वांद्र्याला घेउनि जातो.
त्याहुनिही विध्वंसक हा कत्तलखाना
ऐकवांच जाच्या लाजें खालीं माना

प्रीतीचें सुकलें फुलें उगवतें कोंब
पान्यावर डौलानें गुल्झारे कोंब.
युद्ध-आग लागुनि कणहि न उरतो येथें
वसु पत्रहरण धरती मातेचें होतें.
बाळ पोटच्यांतुनि आतुरतें डोकावी
तों त्याची दुनिया रक्तामाजीं बुडावी
नाचती भयंकर भीति तिथें यमदूत
अन् यौवन गातें स्मशान-शांती-गीत.
सौंदर्य शब्द कोशांतुन पळून जाई
ते कोमल भाव... प्रेतही जिथें नाहीं.
कुणि मित्र कुणाचा चुलता, काका, मामा
या युद्धांमधुनी अजाण येतो कामा
कोणाचा भाऊ, मुलगा, पती–कुणाचा
कधिं पडेल रक्तामाजीं नेम न त्याचा
कितिकांच्या आया बहिणी रंडक्या होती
कित्येक घरादारासह बुडून जाती
भस्मसात भाव्या मुग्धा प्रीतिच्या होती
उध्वस्त जीवनाचीच होती ये माती
तो प्रचंड मानवतेचा संस्कृति ठेवा
त्यावरी पसरला ॲटम बॉंबचा लाव्हा
गन्, रणगाडे, तोफा, बंदुक, पिस्तूल
मानव यांना फळ फूल कसें समजेल ?
युद्धांनीं गरिबाचें कां झालें भलें ?
जग नवें यौवनें सांग कुठें निर्मिलें ?

## मी

मन माझें प्रीतीसाठीं हपापलेलें
जन्मतांच प्रीती प्रीती करनी मेलें

ह्या दंडावरच्या खुणा पहा निरखून
साखळदंडानें नेलेल्या बांधून
अंधारकोठडी दिली ओढण्या मोट
उध्वस्त करुनिया कुटुंब लाविली वाट
ही आई, वहीण माझी प्रीत उदेली
ती जिवंत कसली होती मरुन पडली
पाणीहि वाहिलें तरि पोटाला नाहीं
काहिली जिवाची होवे लाही लाही.
मी दुःख ओकण्या जातों दुसऱ्यापाशीं
तों तोही निघतो दुःखी आणि उदासी
जावें उघड्यानें नंग्यापाशीं खेटाया
जणु तशीच माझी धडपड सारी वांया
एकजात यौवन जळतें मजला दिसलें
कौतुक कुणाचें कुणीं करावें कसलें ?
माझ्याचसारखे लाखों कोटी जीव
तडफडती त्यांची कुणी करावी कींव ?
तूंच सांग कुठवर सहन करावें सारें
प्रत्यक्ष यौवनावर हल्ले होणारे ?
कां सहनशक्तिला सीमा अमुच्या नाहीं
कां यौवनावरी हक्कच अमुचा नाहीं ?
जीवन जगणें हा हक्क गुन्हा ठरला गे
मानवी जीवनाकांक्षा मराय् लागे
यौवन जळतें प्रीतीच्या प्रेतावरती
यौवना सांगती गा प्रीती-आरती
फांसीच्या खांबाजवळ कुणी लग्नाचे
कां बेत करिल ? आश्चर्यच तें जगताचें

## आजही

आजही भोंति जमले युद्धाचे दर्दी
या धनिक गिधाडांनीं केली वध गर्दी
म्युनिक-व्हर्साय इथें जे होते दिसले
अटलांटिक पॅसीफिकवर जाउनि बसले

तेथून हलविती हे युद्धाचें सूत्र
हातिं अॅटम् मुखीं पण लोकशाहिचा मंत्र
वॉलस्ट्रीटवरचे डॉलरचे हे वगळे
चोंचा सरसावुनि दलाल उठले सगळे

आडु माडु, ऐदी येती एकवटून
मार्शल, डल्लेस कुणि चर्चिल होऊन
मज बांधुनि नेले एका सीमेवरती
' हं लगाम आतां ' कर सरबत्ती
टांचा उंचाउनि जरा पाहतों तों मी
तें दिसलें सुंदर दृश्य अचानक नामी.

## काश्मीर सरहद्दीवर

रशिया नि पूर्व युरोप चीनच्या भालीं
जीवनाचि उत्तर-पूर्वा रंगुनि गेली
दुडदुडते यौवन बाळ बाळसेदार
विजयी प्रीतीची हातामधें तलवार

लवलवत्या यौवन वेली तिथें बहरल्या
भरघोस फुलांनीं होत्या डंवरुनि आल्या
अन् पूर्ण विकसले तरुवर मोहरलेले
मनसोक्त घेत होते प्रीती हिंदोले

पोटच्यांतुनी ये बाळ जगीं मानानें
त्या बाळा टाळक नाहीं तेथें रडणें.

नव-मानव-संस्कृति येइ तिथें उदयाला
दुष्काळ नू बेकारी नाहीं नांवाला
ती धनिकांची माजोरी सत्ता नाहीं
गे नाहिं तिथें नांवाला धनिकच नाहीं
दारिद्य, भिकारी जिणें तिथें मग कुठलें.
कीं जिथें ऐतखाऊंचें नशीब फुटलें
ती रोगराइ रोगांनीं जर्जर झाली
या नव-दुनियेंतुनि कधींच उठून गेली.
अन्न-वस्त्र-आसरा ददात नाहीं जेथें
मग प्रश्नचिन्ह तूं सांग कोठलें येतें ?
अज्ञानाचे ती कडवी शत्रू दुनिया
विज्ञानावरती आज स्वार होउनिया
ॲटमशक्तीला चाकर केलें पुरतें
नवज्ञानाला ये नव तेजाचें भरतें
तो क्षणांत फोडुनि पर्वत झाली शेती
गंगेला अणु कण उलटें वाहवुनि नेती
अन् सहाऱ्यांत कापूस, गहूं नवरंगी
ज्ञानें पिकवोनी वायू-गर्व-दुभंगी
तो उत्तरध्रुव कां ती राहण्याची जागा ?
बघ तिथें फुलविल्या नव-प्रीतीच्या बागा
स्त्री-मानव शक्ती निम्मी-होती दासी
ती हात घालते आज पहा गगनासी
तें कर्तृत्वाचें सर्व क्षेत्र व्यापून
ती दावुं लागली नव दुनिया स्थापून
ते कणांकणांतुनि ये निर्मिति संगीत
सुख वाहे दुथडें भरुनी त्या क्षेत्रांत
आनंद निर्मितीचा उपभोगायाला
राणी येइ आज सुकुमार कालची बाला

त्यागाच्या पायावरती पिकलें रान
नाचतें पाहिलें होउनिया बेभान
प्रीतीचें अनेक रंगी स्वरूप दिसलें
जें कल्पनेंत माझ्याही होतें पुसलें.
शांघायपासुनी ब्युडापेस्टपर्यंत
चौफेर विखुरलें होतें यौवन-शेत
अन् स्पष्ट घोषणा यौवन उठवी तेथ
" यौवन शत्रूवर चला करूं या मात "
" यौवन जीवन हें होय चिरायू जगतीं
ॲटमपेक्षां जनताच जगांतिल मोठी "
" हा युवक जागतिक उठला लढण्यासाठीं
जगतांतिल जनता आहे आमुच्यापाठीं. "
" उज्ज्वल भवितव्यास्तव आपण लढणारे
भावि काल आपुला आपुला आहे यारे. "
वृत्ति घोषणांनीं उचंबळुनिया आली
प्रीतीहि मेलि ती जीव घेउनी आली
" जगुं शकतो तूं जगुं शकतो यौवन प्रेम
शांतता लढाईंत आघीं लाव या जोम
एकसंघ उभारुनि फळी युवक सेनेची
कर हड्डि नरम या धनिक युद्धखोरांची. "
आदेश दिला हा जागतीक युवकांनीं
" शांतता-लढा हा लढा प्राण लावोनी. "

## प्रीतीसाठींच

तेव्हांपासुन प्रीतिसंमुख मी झालों
तो आजतागायत तिच्याचसाठीं लढलों
घरकांत घालुनी यौवन जीवन सारें
लाविती वाट हे धनिक चोर परभारें

या कत्तलखान्यांविरुद्ध गाणीं गातों
धनिकांचा फाडुनि बुरखा मी दाखवितों
कवनें मी रचिलीं प्रीतीस्तव लढण्याचीं,
शांतता स्थापुनी नव दुनिया घडण्याचीं
मी जिंकणार ही बात असे ठरलेली
या शांति लढ्यांतुनि फुलेल यौवन वेली
जे म्युनिक, व्हर्साय भूमीवर निश्चिंत
युद्धाचे पूर्वी करीत होते बेत
ते धरून दातीं तृण धांवत सुटलेले
अटलांटिक पॅसीफिक दर्यावर गेले
भूमीवर ज्यांना नाहीं मिळाला थारा
का त्यांना देइल दर्या आज निवारा ?
ती लाट क्रांतिची चल आणूं घडवून
त्या टाकूं त्यांना दर्यांतच बुडवून
हा समोरचा बघ अरबी दर्या सजला
त्यानेंच फेब्रुवारी बाविस गाजवला
शांतता भंगली तो बघ वादळलेला
उत्सुक झाला चल लाट इथुन न्यायाला
हा महारथी जवाहरही अपुला
या शांति लढ्याच्या आघाडीवर आला
युद्धखोर गाडूं चल ये शांति लढ्यांत
ही जिंकुं लढाई हातांत घालुनि हात
शांती प्रीतीची सांगड घालुनि कवनीं
मज वाटे गावे सुंदर सुंदर गाणीं
पण अपूर्ण जीवन मी एकाकी लढतों
त्याचाच करडसा कवनीं ठसिम पडतो
पत्रांत तुझ्या प्रीतीचा येतो वास
जो होता अंतरिं माझ्याही पण प्यास

मी धाडस करतों करितों आज अपेक्षा
दे प्रीत कटाक्ष पुरे जाहली शिक्षा
या अपूर्णतेला गाळाया तूं ये गे
कविताहि उभी तव स्वागत करण्या ये गे
संसार जीवनाचा चल पाया बांधूं
आयुष्य मंदिरा या ये भक्कम बांधूं
सोनेरी त्यावर प्रीत कळस ये चढवूं
ये नव-प्रीतीची नवीन दुनिया घडवूं
जनसागरिं ये चल आधीं डुंबण्या ये गे
त्या प्रीतीशिखरावर जाऊं त्यायोगें
होईल तुझा नि माझा विकास जेथें
यौवन-प्रीतीही खुलेल विकसुनि तेथें
म्हणुनीच आज गाऊं या कवनीं शांती
सोडून क्षणिक ते धुरसट प्रेम-भ्रांती.
तूं करशिल प्रीती-कवनें मी गाणार
सुख नवप्रीतीचें तूं मी अनुभवणार
तूं-मी मिळुनी ती प्रीत-ज्योत लावावी
जी मानानें चिरकाल जगीं तेवावी
चल् चल् लवकर चल् धांवत जावोनी
त्या आदर्श प्रेमा आणूं या ओढोनी
विश्वास मला तूं स्विकार करशिल याचा
गाशिल तूं कवनीं राग असा शांतीचा

ता. क.

हें पत्र तुला मिळतांच पोंच दे त्याची
पाहतों ' अगांतुक ' वाट तुझ्या पत्राची

****

# .१३. काहूर



सागरा ! तूं जवळ असुनिही दूर
मीलनास मन होइ अधिर वध—
उठलें रे काहूर.
गंगेवाणी संथ स्फटिक मी
विशाल नाहीं कांहीं
सह्याद्री उत्तुंग हिमालय
पिता लाभला नाहीं
खातेऱ्यांतच जन्म सदा जी
अडवळणानें वाही
अंतर उमगुनि येइ
जिवा या समजुन उमगत नाहीं
खुळ्या ओहळाला कधिं
येइल का गंगेचा नूर
परी मीलना होइ अधिर
उठलें रे काहूर ॥

कुठें तूं ? कुठें मी ?
कशास ही ओढ जिवा लागे
सागरास जोडाजखडाया
जवळ न माझ्या धागे
लागतो पुनः कसा कळेना
जीव मृगजळामागें
थांग कळेना मनाचा
मला नकळत होतें जागें
घे उदरीं अन् टाक पुसुन
हा ओहळ, ही हुरहूर
मीलनास मन होइ अधिर
वध उठलें रे काहूर.



## १४. मन तुझ्याचसाठीं—

35252

मन तुझ्याचसाठीं तळमळतें
आगींत मन-मोहळ जळतें.
गुलाब, बकुली नाहिं अंगणीं
सहाऱ्यांत का येइल कोणी ?
रूक्ष अशा माझ्या जगतांतुनि
चोर पाउलें गुलाब बकुळि
नकळे कोठुनि दरवळते
मन तुझ्याचसाठीं तळमळतें.
नीज नयनीं अस्वस्थ होउनी
कुलुपें दोन्ही नयना ठोकुनि
येइ कवाडें घट्ट लावुनि
टिक् टिक् नाजुक कुठुनि ऐकतां
नीज जीव घेउनि पळते
मन तुझ्याचसाठीं तळमळतें.
पिसाटापरी शोधित निघुनी
मागावर वणवण भटकोनी
येइ न का यश नये उमगुनी
जळासाठिं मृग सतत धांव घे
अधिर तसें मन व्याकुळतें
मन तुझ्याचसाठीं तळमळतें.
लपंडाव बस् संपला आतां
बांध कोठला ना जुमानतां
प्रचंड फोडुनि पर्वत माथा
होउनिया बेहोप भेटण्या
बघ मन सरिता कोसळते
मन तुझ्याचसाठीं तळमळतें.

# .१५. जलकमळ

चुळवूळ नित्त जळ कां ग करी
चाले कां अंतरीं धडपड ॥ १ ॥
अंकीं खेळवाया नाहीं तें कमळ
म्हणुनी कां जळ कष्टी होई ? ॥ २ ॥
निर्मळ तें जळ झालें ग गढूळ
प्रसूतीची वेळ जणू भासे ॥ ३ ॥
कुणासाठीं जळ चिखलें माखलें
कमळासाठीं कां केला त्याग ? ॥ ४ ॥
आनंदलें जळ उठले तरंग
नित्त–नवरंग कमळाचेही ॥ ५ ॥
जळ नि कमळ वेगळाले जीव
परी एकजीव सुखी दोघें ॥ ६ ॥
काळ आकसून घेई जळ सारें
कमळ बिचारें मान टाकी ॥ ७ ॥

****

# .१६. पृथ्वीचें प्रेमगीत



पृथ्वीला चंद्राची ओढ लागली आहे—

मजा लुटाया दुनियेचि सारी
रात पुनवेची समर्थांत न्यारी ॥

चांद पुनवेला गगनांत नसतो
माझ्या पलंगावर येऊन बसतो
रात सारी खुदूखुदु हंसतो
देतो इष्काचा रंग, त्याचा आगळाच ढंग,
त्यांत होतें मी दंग
वाट पहातें उभी त्याची दारीं
मजा लुटाया दुनियेचि सारी ॥ १ ॥
माझ्या दर्याला आली हो भरती
धरला लाटांनीं पिंगा त्यावरती
बांध फोडाया त्या म्होरं सरती
दुग्ध धारा चरून, वर्षे ना का अजून ?
वख्त जाई टळून
उभि तहानेलें ग बाई भारी
मजा लुटाया दुनियेचि सारी ॥ २ ॥
रात बाराचा अंमल झाला
चंदाराया कसा न्हाई आला
दूर पिंगळा कुठं किरकिरला
मरणालाशी गाडुन, राया येईल चढून,
नाहिं राह्यचा अडून
दडली कां हो ढगाआड स्वारी ?
मजा लुटाया दुनियेचि सारी ॥ ३ ॥
झालें अधीर याया हो राया
झुरणि लागे वघा माझि काया
आतां लपता कशालाहो वाया
हात चंदेरी द्या, मला उचलून न्या,
सारि जिनगानि घ्या
देह पडला हो घ्या चरणावरी
मजा लुटाया दुनियेचि सारी ॥ ४ ॥

# .१७. सुगीराणीची मोहिनी

सळकन नागिणीवानि, येऊन बनांतुनि एळ साधुनि.
नयनांनीं सोडिला बाण—सोडिला बाण
जरी हातीं धरली गोफण, होती गुंड्यानं तुझ्या करणीनं
भारला जाऊन झालों हैराण—झालों हैराण ॥ ध्रु० ॥

अप्सरा उतरली स्वर्गावरची खरी
जणू चम्‌चम् चमकती मोती कपाळावरी
झळझळा झळकते लाल कुंकाची चिरी
असं ध्यान पाहुनि, भान हरपुनि
तान भूक पन मेली—भूक पन मेली
माझी दुनिया राणी रंगली, मती गुंगली आज एक झाली
तुझ्या पायदळीं टाकिली मान—साजणं सोडिला बाण
पायदळीं टाकिली मान ॥ १ ॥

फडकतो शालू तुझा हिरवा हिरवागारं
लकलका तळपते तुझी तनू तलवार
उफनत सोडुनि गोड धुंदिची धार
नोक झोक सारं काई न्यारं, नवतिची नार सुगीचं दार
फाटच्यापारं आलि ओलांडून—आली ओलांडून
झपाटलों पुरा जाऊन, प्राण मुठिंतून, उभा घेऊन
चरणिं ठेविले घेई ग दान—सजणं थोर होऊन
घेई ग दान ॥ २ ॥

****

प्रतिक जगीं आगळेपणाचें
अजर नि अक्षय टिकेल कां हें ?
हा बसलेला बाबा शंकर
भस्म लावुनी सर्वांगावर
रूक्ष, जटाधर, रुद्राक्षेश्वर
काय कळे त्या विद्रुप, सुंदर ?
निर्माल्यच तो करिल सुमाचें
जया वावडें सौंदर्याचें
मज कर्रीं येइल जर " तें खातें "
आगळेपणा आणिन त्यातें.
हिलाच अमृत देउन सुखविन
अजर नि अक्षय बनवुन ठेविन
सौंदर्य असो कुठलेंही मग
त्यास अमरपद देउन टाकिन.

****

हीच हृदींची तळमळ
राधे राधे, मी गोकुळिंचा नाहीं राजा
कृष्ण आहें मी, परंतु अगदीं साधा
कारकून मी.
गोवर्धन गिरधारी नाहीं,
कीं जगताला देइन आश्रय
गिरि उचलोनी करंगळीवर
आश्रय नाही तुला मला
म्हणुनींच नाहीं का सारी धडपड ?
माझ्या राधे कसली शंका पुनरपि तुजला
तिष्ठलीस तूं माझ्यासाठीं.
हें का मजला उमगत नाहीं ?
काय करूं मी, हतबल झालों.
गरजू होतों, आहें म्हणुनी......
ऐक तरी......
या आंख्या डोळे आवर क्षणभर
त्या कामांतच होतों म्हणुनी
ठेव जरा विश्वास राधिके
लग्नहि व्हावें......
लग्नानंतर तें चिरमीलन
मी तूं, तूं मी विसरुनि जावें
एवढीच ना मनीं अपेक्षा......
म्हणुनीच खोली शोधायाला
गेलों होतों माझ्या राधे
धडपड माझी निष्फळ ठरली
होय राधिके–माझ्या राधे

****

## .२७. सांत्वन

प्रेमभंग झालेल्या तरुणास उद्देशून:—

भावफुलें सुकलीं जरि तुझीं—
साद घातली साऱ्या जगतीं
स्वप्न राणि कां ये सांगाती ?
आंसूंचे पसरियलें मोतीं
येइल कां कोणी— जरि तुझीं ॥

मोल कधीं जगिं या आंसूंना
स्वहृदयीं करपल्या सुमांना
बाजारी आणुं नको त्यांना
हंसविल तीं बघुनि— जरि तुझीं ॥

लावियलें कुणि वेड कुणाला ?
भासतो कुणा आज उन्हाळा ?
जिथें हिंवाळा तिथें उन्हाळा
जगताची करणी— जरि तुझी ॥

सुकलीं सुकुं दे जळलीं जळुं दे
स्मृती तयांची हृदयीं वसुं दे
जीवन तव स्मृतिमय होउं दे
पाणी नको नयनीं— जरि तुझी ॥

जीवन हें संग्राम मानुनी
लढण्यासाठीं ये मैदानी
कुठलि भावना कुठली राणी
स्मृतिसह जा जळुनी— जरि तुझी

****

# २८. वाद्यें आणि माणूस



निघे सा प सा वाद्यांमधुनी
सासा पपसा सासा पपसा
नरडें घासुनि होइ कोरडे
घे जन्मा केवळ सापपसा
गणलीं जातीं वाद्यें निर्जिव

तसा सा प सा माणुस करितं
कसरत अवघ्या नरड्याची ती
नसे हास्य, शृंगार ना रडें.
सासा पपसा सासा पपसा
परंतु माणुस ? सजीव ठरतो !

## .२९. जीवनौघ

" सरिता माझ्या आयुष्याची
जाइल कोठें खंत सदाही
वाहिल का ही आटुन जाइल
देइल का कुणि शाश्वति याची ? "
सरिता सदाच राहिल वाहती
उत्तार-धर्मा जागुनि जगतीं
कशास नसती खंत नि भीती ?
फक्त धाव घे तिज सांगाती.
ये रोधाया कडे कपारी
बांध असूं दे पर्वतमाथीं
शक्ती एकवटुनिया सारी
फोड बांध तूं सोडुनि भ्रांति.
सरिता सदाच राहिल वाहती
उत्तार-धर्मा जागुनि जगतीं

****

# .३०. माझी दिवाळी



घरांघरांतुनि होति चालली राजरोस या इथें दिवाळी
मी माझ्या ओसाड शेति अन् निराशित होतों दीन उन्हाळी

निराश होउन, खिन्न मनानें,
दुःखिहि जसा शर लागाचा
नाजुक अवयव छेदुनि जावा
रात्र किरंशी रातकिड्यांची

किरकिर चाले तशी सभोंवार
चाढत जाई रात्रहि वरवर
एकहि तारा न आकाशीं
ढगाळलें नभ चाले तगमग

वाटे मजला उचलायाला
कां ती घटका धावत ये ना ?
असेल येतच.
असेल येतच, दिसत नसावी

कुणास ठाऊक त्या घटकेला
तम सटवीही छळत असावी.
घों घों वारा सोसाट्याचा
सुटला भासे प्रलयांतीचा

मलाच उचलुन न्यावें म्हणुनी
घटका ये कां घालित तांडव
मारा हिम दगडांचा करुनी
गेली घटका तशीच निघुनी

आणि लव्हाळा कुजबुजला मग
क्षणभर लव, पण मोडुं नको तूं

****

# ३१. एकान्त

मी एकान्तीं — रमून जातां
मी एकान्तीं — गाणीं गातों
गाणीं कसलीं आग ओकतों
जीव त्यांत मी भाजुनी घेतों
अश्रूंनीं ती आग विझवितों ॥

हृदीं उमलल्या सुकुमार कळ्या
ज्या नच अजुनी पुऱ्या उमलल्या
परी उमलण्या आधींच चुरल्या
खूप खोल काळजांत आपुल्या
स्वहस्तेंच गाडून टाकतों. ॥

आशाभंग नि मानभंगही
दुःख यातना जगीं प्रत्यहीं
साहुनि वाचे न फुटे शब्दहि
आकाशा घालण्या गवसणी
मी मैदानीं जरी गर्जतों ॥

दुःख असो तें माझें मजला
मी कां वाटें तें जगताला ?
जगतां देण्यासाठीं आहे
धीर शब्द स्वर आत्मा अपुला
सर्वस्वच मी जगता देतों ॥

****

# ३२. मालन कामान सुकला




काम करन गिरणींत थकलो रं
माझी मालन कामानं सुकली ॥

फाटं पिकलेलं जांभूळ ताजं
नाचे चौखर हरिणच मांग्रं
निरल्या सायीच रं लोणि ताजं
ज्यानि साच्याच्या सांध्यांत टाकली रं
माझी मालन कामानं सुकली ॥ १ ॥

कोंडवाड्यांत कोंडून घेऊन
टाकला जीव रहाटानं खाऊन
काम केलं तरी मन लावून
वर्ति नायकोनीची चाले टकली रं
माझी मालन बोलानं सुकली ॥ २ ॥

" कधींवर्चीं तुला व्हावीं चार
सुखी संसार शाळेंत पोरं
पोरं व्होत्याल कुळाला म्होरं "
समदि आशा ही धनाला विकली रं
माझी मालन भाग्याला मुकली ॥ ३ ॥

गरीबांच्या जवानिचा बळी
धन त्या दिसा बांधून मोळी
करतो आठच घंटांत होळी
आतां पायवाट ह्यांतून निघाली रं
आमा आजवर होती जी चुकली ॥ ४ ॥

चल मिळून मैदानि जाऊं ये
झेंडा सुखाचा मैदानि पाहुये
गाणिं मिळून क्रांतिचीं गाऊं ये
आलि ज्यानि हंसत ही आपली ग
आणि खुलली कळी यव सुकली ॥ ५ ॥

****

ma kd Chaia

## ३३. पारव्यास



अरे मनाच्या क्षुद्र पारव्या
घरट्यामधुनी घुमत राहुनी
विसरलास तूं स्वतःला पण
हें नच जीवन हें नच जीवन

जीवन क्षुद्र न घरट्याइतुकें
· नीलाकाशीं स्वैर विहरणें
हिरवीं शेतें दाणें टिपणें
बाहेर ससाणा आला त्याला टांग मारणें

मृत्यूवरती विजय मिळविणें
विजयानंदीं साल सुरावर नाचत येउन
पारविला आलिंगन देणें
चुंबन घेणें.

मृत्यूवरती विजय मिळवुनी
आणला चारा बाळांना
चोंचींतुन भरणें
नवजीवन तें

अन्नकणानें जिवंत ठेवुन
ज्ञानकणानें फुलवित नेउन
ज्ञान तोय तें
आकंठ सतत पिऊन झिंगुन

आदि अंताच्या झोल्यावरती
मुक्त आणि बेछूट बेधडक झोले घेणें.
येड्या यांत आहे रे जीवन
अरे मनाच्या क्षुद्र पारव्या

****

## .३४. विटीदांडूचा खेळ

विटीदांडुचा खेळ आमुचा चाले झोकांत
अवघी अवनी पाहुनि बुडते ब्रह्मानंदांत

आम्ही कोलतों विटी भिडूच्या नच लागे हातीं
विटी फेकती भिडू येउनीया दांती काती
पुनः हाणुनी विटी भिडूंवर मी करतों मात
भिडु कसले तीं परिस्थिती चोळित बसते हात
विटीदांडुचा खेळ आमुचा चाले झोकांत

पहिला टोला देतों ठेकुन जातो गगनांत
दुसरा टोला पाताळीं शेषाच्या दाढेंत
उत्तर–दक्षिण ध्रुवा गांठतो तिसऱ्या टोल्यांत
सारें अंतर माझा दांडू क्षणांत मोजीत
विटीदांडुचा खेळ आमुचा चाले झोकांत

दुसऱ्या डावीं पहिला टोला गतेतिहासांत
छेदुनि जाई दुसरा टोला भविष्यकाळांत
तिसरा जाई वर्तमानिंच्या कोनाकोनांत
मोजुनि दावी दांडू माझा कालाचे दांत
विटीदांडुचा खेळ आमुचा चाले झोकांत

विटीदांडुचा डाव चालतो छेदित स्थलकाला
डोंगर मी नालांचा रचितों विटीदांडूवाला
विजय मिळवुनी परिस्थितीवर हा निमिषार्धांत
दोन घडींचा डाव संपतो तो आनंदांत
विटीदांडुचा खेळ आमुचा चाले झोकांत

****

# .३५. कोकिळेस




कोकिळे गाऊं नको ' तें ' गीत
जाळित सुटते मानवहृदया
जें भेसुर संगीत......कोकिळे

भूक येइ पायांत माशि वध
होइ जिवाची तगमग तगमग
डम् डम् गोळी देई धनिक जग
प्रतिकाराची शक्ति आमुची
जाइल गे मातींत......कोकिळे

वर्सेति वरुनी तुफान गारा
गारठलेला झोंवत वारा
ठेचाळित शोधितो निवारा
रंगमहालीं दंग होउनी
गाउं नको हिणवीत......कोकिळे

" मी धनिणीच्या घरांत गातें
काय कुणाच्या बाचें जातें ?
स्वतंत्र माझा मार्ग काढितें "
धनिक प्रसंगीं, गाजर पुंगी
गे बसेल चघळीत......कोकिळे

बंद करी हें गीत मोहिनी
क्षणांत धुंदी पडेल झडुनी
चिडला मानव येइल धावुनी
धन्या आवडिचा घोट नरडिचा
घेइल गे अवचींत......कोकिळे

गायचेंच तर काढ नवा स्वर
साद शिंपुनी वनांत निर्भर
उठव वनींचा भोळा शंकर
नाचायाला लाव तयाला
घुमुं दे तांडव गीत......कोकिळे

****

# ३६. जीवन हें गाणें



रे जीवन हें गाणें
गात रहा प्रेमानें

सप्तसूर ही मूळ प्रकृती
त्यांतच कोमल जन्मा येती!
श्रुतिहि क्रमानें विकसित हो
रे अपुरें हें गाणें !
अपुरें गाणें जन्मा आलें
आत्माभाव रसाचा प्याले
शब्दार्थानें वस्त्र पुरविलें
चाले पण तालानें !

" पुढें उमेदिंत जीवन यावें
नाचावें, खेळावें, गावें
त्यांत चराचर रंगुनि जावें—
फक्त रहावें गाणें ! "
या आशें जीवन जगतांना
तानावर ताना घेतांना
लढत जीवनाग्रत जातांना
पिडलें घन मोहानें !

जीवन ठायीं ठायीं नाडिलें
घटसर्पच जणु घशास भिडले
त्यांतुनि जे धडपडले जगले
विकत मातिमोलानें— !
आज एकही सूर न लागे
तुटति तटाटट जीवन धागे
नेइ खेंचुनी मागें मागें
घर्घर ही कां गाणें ?

होत आहे उध्वस्तच सारें
म्हणुनि तरी या उठा उठारे
तार सप्तकीं स्वर लावारे
फुलवा गीत नव्यानें
कणांकणांतुनि गीत स्फुरूं द्या
नवरस गंगा ही निर्झरूं द्या
लढत गाउनी हें दाउनिया
अमर आमुचें गाणें.

****

## .३७. जीवन मौक्तिक

आक्रोश करा "याची नौका लागे बुडावयाला !"
शापाचें जग कधींच गेलें वेड्यांनो विलयाला.
जीवन्मोती घेउनि पोटीं आहे दर्या बसला
मज़ुरडे, कुणवट हिणवोनी फेस फेसळुनि हसला.
लाटांच्या बंदुक-तोफांचा अम्हां धाक दावोनी
अजस्र, हिंसक जलचर ताफा तोहि पणा लावोनी
सर्व समजुनी झुंज झुंझण्या आलों मैदानी
ठाव तळाचा घेऊं ऐसा निश्चय बांधोनी.
जन्मतां आम्हीं जन्म पावला
त्या मृत्यूची भीति आम्हांला ?
छायेंतच जो सदा साथिला
तो आम्हांवरि घालिल घाला ?
तो तर झाला मित्र जिवाचा कर्तव्यच अजि त्याचें
साथ राहुनी अमुच्या अवघा सागर जिंकायाचें.
माझी नौका एक एक रक्त होय हुतात्मा कसला
ध्येय-मेरु रणसंगरिं लटतो अमर होउनी बसला
त्याच्या रक्तानें झालेली पुनीत नौका माझी
भींतीवरचें रक्त साक्षही स्मृती सदाची ताजी
रक्त नव्हे हें अस्त्र सागरीं नौका तारायाला
कां माझी ध्येयाची नौका मजला बंदीशाला ?
अवघा जीवनसंगर माझी नौका जाइल तरुनी
जीवन्मोती घेउनि येइल सागर मंथन करुनी

****

## ३८. मानव जाइल यशाप्रति

(या महायुद्धांत पतन पावलेल्या सैनिकांचा इशारा— )

अरे ! आमुचीं हाडें मिसळलीं ना अजुनी मातींत
पॉवरि कां युद्धाच्या धमक्या या मानवजातींत

भूमातेच्या जखमा अजुनी आहेत रे ओल्या
कमीच झाल्या म्हणुनी योजना नव्या काय आंखल्या ?
स्राव थांबुं द्या, श्वास घेउं द्या, जीव येउं द्या तींत
खड्ग पाजळा मग खुपसाया मातेच्या छातींत

सजला होता मासणुकीला ठेचायाला काळ
मूढांनो ! माणुसकी मरते, झालें किति जरी हाल ?
पुन्हा सिद्ध जाहला रोवण्या पाय तिच्या छातींत
उभी राहुं द्या, उठुनि पाहुं द्या हीन शत्रुची रीत

माया-बहिणींच्या किंकाळ्या हवेंत ना विरल्या
नाहीं उमलल्या आशा अजुनी काल तुम्ही चुरल्या
त्यांचे मेले आत्मे गाती रे भेसुर संगीत
निःशस्त्रांच्या धडग्यावरती कां गातां रणगीत ?

काल तोडला पाय ठिबकतो तो रक्त-थेंब त्यांतून
त्या पायांतुनि बूट काढिला नाहीं लेस कापून
स्फूर्ति मिळाली कुठून सांगा तुम्हांस ही अवचीत
गाउं लागला पुनः अमानव, ओंगळ, भेसुर गीत !

शस्त्रास्त्रांनीं, दमदाटीनें लढाई कां जिंकाल ?
लोखंडाचे दाणे चारुनि कां माणिक मिळवाल ?
घणे रातिं नित लोखंडाचे त्यां कराल भयभीत ?
मानव-पूजक मानव कां धमक्यांनी होइल चीत ?

" भूमातेचा संहार करूं मानवतेचे हाल "
तुमच्यावाणी हें म्हणणारे मींच गाडिले काल
तुमचें लष्कर ! काय आहे तें तुमच्या अणुशक्तींत
अणूंमध्यें नाहीं तें आहे मानवता-भक्तींत

क्षण थांबा रे ! पुन्हा एकदां जन्माला येउन
अमानवाचा घोट नरडिचा घेउन अन् दाबून
समूळ उपटुनि भविष्यांतुनी जाइन मग मातींत
ध्यानिं असूं द्या मानव जाइल यशाप्रती निश्चीत

****

# ३९. कैफियत



घरांतल्या खुर्च्या नि टेबलॅं
भांडीं, कपाट फुटकॅंतुटकॅं
कापडचोपड होतॅं नव्हतॅं
विकावया मी बसलॅं होतॅं

दिवसांहे होता बाजाराचा
होती गर्दी अती मनस्वी
तोटा नव्हता गिन्हाइकांना
अगदीं सुद्धां त्या बाजारीं
येउनि पहाती अन् न्याहळती
न्याहळतीं अन् पुढेंच जाती
विक्री तर पैशाची नाहीं
मला लाइली होती घाई
घुटमळती पाहिली असामी
विचकत थबकत निकट जी आली
हळूच बोटानें खुणवोनी
भंवतीं पाहुनि लागे कानीं
' माल आहे हा जुनाट ' सगळा
टाकाऊ तर जगावेगळा
नाहिं विचारित कुणीहि याला
गिन्हाईक परि मीच एकला
आणा पैसा अधिक हवा घे
फुटकातुटका माल असूं दे
तरीहि पण मी घेइन याला
खुणवुनि ' डोळ्यानेंच ' बोलला
" माल घेउनी घरापतुर चल
त्याचा देइन दाम वेगळा "

*          *          *

अजब मासले माणुसकीचे
विपत्कालीं लाभतात त्रासें.

****

## .४०. बुद्धीचें हत्यार

संगरांत होते निर्मिती रोज नव्या हत्यारांची !
नवीं शस्त्रास्त्रें घेतात जन्म
निर्मिती कराया मानवी प्रेतांची;
रास रचाया मानवी प्रेतांची.
आणि शेवटीं बिचारीं शस्त्रें—
होतात हताश, टाकतात मान,
क्षणांत बोथटून धाराहीन होऊन
जातात बिचारीं तींच मरून.
पण मानवाच्या बुद्धीचें शस्त्र
कधीं नि केव्हांही गंजलेलें नाहीं—बोथटलेलें नाहीं.
धार त्याची आहे तशीच
तीक्ष्ण आहे, राहील तशीच.
तीक्ष्ण अशी चिरकाल अमर
आणि अजर यावचंद्र दिवाकरी.

****

## ४१. उपेक्षित



प्रकाश नाहीं सूर्याचाही
चंद्र, तारका, हिरकणिचाही,
काजव्याहि पण चमकत नाहीं
कसला असेल प्रकाश इवला ?

इवला प्रकाश गदाधारा
धक्का देतच पाय रोवुनी
उभा आहे हें दिसतें आहे
उमगेना पण प्रकाश कसला ?

प्रकाश कसला कुणी प्रसवला
या पणतीनें ! हं हं हं हं ! !
मातीची ही पणती चिमुरडी
कुठचा हो प्रकाश देइल ?

हीच चिमुरडी घालिल म्हणतां
अंधाराला अशी गवसणी ?
टिटवीनें सागर गिळण्या—
इतकीच आहे ही खुळी कल्पना

तेलहि खाते, वातहि खाते
कधीं स्वतःची माती खाते
दिलीच तर काजळी देते
प्रसवणार का प्रकाश पणति !

छे, पणतीचा प्रकाश नाहीं
चमत्कार हा असेल कांहीं
'भुताटकी' ही असेल अथवा
असेल 'लीला' परमेशाची

★ ★ ★

क्षण थरथरली पणती ऐकुन
सत्यहि मेलें पार गारठुन
पणति मात्र तेल वात खाउन
जळते, जाळीत उजळित आहे.

****

# .४२. भोंवरा

नको मला ही स्थिरता असली
ज्यांत मानवी तगमग नाहीं
स्थिरता हवीच असली तर ती—
जसा भोंवरा घेउनि हातीं
गति देण्यासाठीं झोकावा
द्रुतगतिनें तो फिरत रहावा
फिरतच असतां असा दिसावा
जसा भोंवरा फिरत नसावा
प्रचंड विश्वाचाहि भोंवरा
अशा स्थितींतच याच गतीनें
फिरतहि असतो स्थिरहि भासतो
विश्वाचीं बाळेंच आम्हि तर—
इतकी गति अन् इतकी स्थिरता
हवीच मानव–जीवनचित्ता
तरीच जीवन–साफल्याचें
समाधान होइल तें साचे.



# .४३. माझा माग



मी तो कोष्टी आहें न्यारा<br>
माझा माग मला बहु प्यारा

प्रतिक श्रमाचें माग असे हा
नच हा धोटा बुद्धी गाभा
आणि भावना झाल्या धागा
होउनि जागीं जीवन प्रतिभा
धागा-धागा जुळवुनी सारा
माग नाचतो माझा प्यारा
माझा माग मला बहु प्यारा

कितीक धागे हिरवे लाल
किती रेशमी अन् बिनमोल
कितिक सुताड्यागत दिसतील
चिवट टिकाऊ परि ठरतील
धावुनि धोटा करि जरि मारा
नेट निभावुन प्रसंग सारा
माझा माग मला बहु प्यारा

वस्त्र विणाया आयुष्याचें
धरलें मनगट मीं मागाचें
धोटा घेउन भक्तभारी
साऱ्या नाजुक जुळवुनी तारी*
धोट्यासंगें नाचति तारा
दे जन्मा आनंद निर्झरा
माझा माग मला बहु प्यारा

निर्मितीचा आनंद भला
त्यांतच मी परमार्थ साधला
'माझें' 'मी' 'मज' भाषा खोटी
विणिलें वस्त्रच ठरो निवारा
दुःखि दीन मनुजास उबारा
मी तो कोष्टी आहें न्यारा
माझा माग मला बहु प्यारा ॥

* विणकऱ्याच्या भाषेत धाग्यांना तारा असें म्हणतात.

# .४९. केशवसुतांप्रति



रे तात कृष्ण केशवा !
ज्ञानेशाच्या वंशाचा तूं एक शोभतो दिवा
रे तात कृष्ण केशवा !

ज्ञानेशाच्या मराठिची अन् तुझ्या तुतारीची
झालि उपेक्षा तरी तुझी अन् कुणबट तुकयाची
'जिंकिल माझी माय मराठी, पैज अमृताची'
'विष्णुदास मउ मेण मेदुं परि कठीण वज्रार्शी'
'देवदानवीं भडवायाला' तव निर्धारच हवा
ज्ञानेशाच्या वंशाचा तूं एक शोभतो दिवा
रे तात कृष्ण केशवा !

वंडाचा या झेंडा ज्ञानेशानें रोवियला
अभंगवाणी तुकयानें तो तेजें झळकविला
प्रसंग येता त्या झेंड्याचें रक्षण करण्याला
प्राणपणानें तुतारि गानें हलवी तूं भूला
तूं नव मनुचा नव्या दमाचा शूर शिपाई नवा
ज्ञानेशाच्या वंशाचा तूं एक शोभतो दिवा
रे तात कृष्ण केशवा !

बुडला सारा देश बुडालें जग अंधारांत
भडकुनि उठली जनता सत्तावनच्या वंडांत
आणि चमकली विजली लक्ष्मी धनांधकारांत
दशक वावरे वीज सुसजन-मन-मंदीरांत
तीच वीज साकार लेखणी करी लवलवा
ज्ञानेशाच्या वंशाचा तूं एक शोभतो दिवा
रे तात कृष्ण केशवा !

आगरकरांच्या मनिंच्या उठल्या आशामय लहरीं
ज्योतीबाची मानवता ती प्रेमरूप सारी
टिळकांचा केसरी गर्जला मराठिच्या उदरीं
आशा प्रेम नि शौर्याच्या तूं उधळुनि सरिवर सरी
टिळक, आगरकर, ज्योतीबांचा दिला साधुनी दुवा
रे तात कृष्ण केशवा !

****

# .४५. मरण



जन्मतांच मिरवाया लागे  
अनुभवलें ते सांगत आपुले  
'अनुभवांत' त्या खचित आहे हो  
मरणच त्याचें सांठवलेलें.

****

## ४६. चरित्र माझें

चरित्र माझें चरित्र माझें
जें अश्रूंच्या डोहीं भिजलें
स्वेद नदीच्या पुरांत फेकुनि
रक्त-सागरीं ही बुडविलें
तरीहि माझें चरित्र अजुनी
नाहिं संपलें नाहिं संपलें
कारण त्याचें अगदीं साधें
जीवनावरी माझी श्रद्धा
सत्यावरती असीम भक्ती
यांतच आहे दडली शक्ती
चरित्रास या तारायाची
अवघें संकट वारायाची
मानवि–जीवन चरित्र माझें
तुकयाची ही आहे गाथा
अक्षय आहे अक्षय राहिल
प्रचिती अमरत्वाची देइल

****

## .४७. बरोबरीच्या कैद्यांस

[ प्रत्यहीं जीवनांतल्या परिस्थितिरूपी तुरुंगांतसुद्धां श्री. नाजिम यांनीं केलेलें सांत्वन हृद्य ठरणार नाहीं काय ? ]

कधिं न सोडिली जगताविषयीं तूं आशा
तूं न विसरला कधीं आपुल्या प्रिय देशा
मानव-प्रेमाविषयिं तुझ्या किंतु न कुणा,
जेल-जीवनांतही दिसती त्या त्याच खुणा
म्हणुनि गजांशीं तुरुंगाच्या बांधती तुला
काळें पाणी अथवा, देतिल फांशीला.
होइल शिक्षा पर्वा नाहीं जरी तुला
बोलुं नको परि मित्रा तूं असल्या बोला
" पवित्र झेंड्यागत लटकुनिया फांसाला
फडफडते राहुनी सोडलें प्राणाला
तरीच होइल माझ्या देहाचें सोनें "
नको गाऊं रे मित्रा असलें तूं गाणें.
छे ! छे ! जगणें कर्तव्यच आहे तुजला
जरी तुझ्या जगण्यांत राम नाहीं उरला.
शत्रू अपेक्षेपेक्षां एक दिवस अवघा—
अधिक जगुनि तूं खिजव त्यापुढें राहि उभा.
कारागारीं तव एकाकी जीवन हें
होय ! विहिरिच्या तळाचा दगड भासूं दे,
मात्र तुझा तो आत्मा, या दुनियेमधल्या
जन-जीवनांत अगदीं पुरता मिसळूं दे.
जेलपासुनी चाळीस दिवस प्रवासाच्या—
अंतरावरी असलेल्या त्या झाडाच्या—

देठावरलें एक पान जर थरारलें,
मग तुला त्यामुळें पाहिजे शहारलें.
पत्र-प्रतीक्षा सुरंगांतली गोड किती
मांमाळी या धोकाही पण त्यांत अती.
नोकरीत तें गाणें शून्यांतच पहाणें
छवास रोखुनि दृष्टी तें पडुनी रहाणें
पहाट होई तों तळमळणें, तडफडणें
गोड अतीशय तसेंच भयंकर असें जिणें.
जरूर, दाढी करतांना आरशांत पहा
पहा, परंतु वह आपुलें विसरोनी जा.
वसंतांतली गुलाबि संध्या, उषा, लिहा
वांचन या मर्मांपासुनि तूं स्वतःला
भाकरिचा फक्त पाडाया विसरूं नको.
पण शेवटचाही तूं खाया विसरूं नको.
पोटभरोनी हंसायचाही विसरूं नको.
कुणास ठाऊक तुझ्यावरिल तव पत्नीच्या—
प्रेमाला लागली ओहोटी शक्य न कां ?
नच हे क्षुल्लक यदि जीवनाच्यासाठीं
जणु मोडारी कोंवळि झाडाची फांदी
याग, गुलाबांचे स्वप्नामाजी येणें
सुख फसलें रे ! तें तर दुःखाचें लेणें
पर्वत, सागर यांचा विचार......तेंच बरं
मिळेल सुख तें त्यांतच तुजला......तेंच खरं
माझा तर तुज सल्ला हा कीं याच लिही
विसावूं नको याच लिही विणण्या येई
अशा रितीनें दहावीस पत्रें कांहीं
अंधारी-कोठडी जियें अवघड नाहीं.

अशक्य नाहीं सर्व शक्य जीवनांत या
एकच पण ऐक तूं कान लावुन समया.
तव छातीच्या डाव्या बाजूस अगदीं आंत
अमोल ऐशा रत्नजडित भव्य कोंदणांत
विनालशी ती हृदयरूप दिव्य संपदा
झगमगती रे झगमगती राहुं दे सदा.



मींही उचलला वाटा अपुला
समाधान हें हवेंच मजला.
म्हणुनिच जगणें असें तसें नच
हक्काच अन् मानाचें पण
लढत राहुनी रोज मरूनिही
जगेन मी आगळेंच जीवन
मी मेलों कीं सर्व संपलें
नाहिं म्हणत मी याला जीवन
मी मेलों तरि व्यापुनि राहिल
माझें जीवन अवघें त्रिभुवन

****

# .४९. बैलगाडी

Khatavi



गाडी केली शब्दांची जोडि भावना-बुद्धीची
जीवन आत्मा हकतो माझी-गाडी-चाले काव्याची

****

## ५०. सत्यं शिवं सुंदरम्

मला लाभलें नभ जरि सुंदर
विशाल आणिक नयनमनोहर
नाहीं धरती पायाखालीं
राहुं कुठें घेउनि निलांबर ?
धराहि लाभे मज त्यानंतर
फुलें उमललीं जिथें सर्वभर
पण अर्थाचा कण नच उमजे
जगूं कसा नुसत्या गंधावर ?
स्वरांत अमृत जणू ओतलें
असे शब्दस्वर कानीं आले
अशा अमृता अमुप पिउनिही
अमृत तें पण जगविल कुठवर ?
रतिगत लाभे मला प्रिया ही
तन मन अर्पुनि चुंबन दे जी
तिचा नि माझा प्रीतिसागर
आटे जधीं ये माथीं भास्कर
दो प्रहराचा महिमा भारी
तत्त्वज्ञानें पचवी सारीं
दुनियेमधल्या सत्याचे ते
रूप सत्य, शिव आणि सुंदर ॥

****



सूत्रें गाउनि
अनेक ऋषिंनीं
महर्षिनींहि
परंतु अजुनी
नाहिं जाहले
सुसूत्र जीवन, सुस्थिर, सुदृढ.

अजुनि फळाला
न ये तपस्या
त्या धीरांची
ऋषीवरांची
कृतिची जोंवर
जोड न त्याला
गतिचाही अंदाज न झाला.

एक मुनीवर
जन्मा येइल
गति-मति-कृतिची
सांगड घालिल
सूत्रें घेउनि
पायाखालीं
विज्ञानाचें भस्म लावुनी
सर्वांगाला,
बसेल मुनिवर
कोट्यवर्षींच्या
हृत्पटलावर
सुसूत्र होइल
सूत्रें, जीवन

****

## .५२. ओढ

मी एकाकी लढतों आहें
एकटाच धडपडतों आहें
धडपड माझी माझ्यासाठीं ?
अगदीं नाहीं अगदीं नाहीं.
विकास मम संस्कृतिचा व्हावा
मानव्याचा वेल चढावा
फुलें फळें त्या यावीं गोड
हीच अंतरीं लागे ओढ.

****




फेसाळत झेपा घेइल पाणी जेथें  
सुंदरता जन्मा येइल तेथें तेथें;  
ठेचाळत मानव जाइल जेथें जेथें  
बुद्धीची वृद्धी होइल तेथें तेथें.

****

# ५४. मी शोधित आहें

मी शोधित आहें पहाट स्वातंत्र्याची
जीं काल पाहिलीं स्वप्नें, वाट तयांची.
ही धूसरता संपता मुळीं संपेना
ती लाली उषेची दिसे न का उमगेना
ही धूसरता क्षण घटकेपुरती असती
तरी आम्ही तिची शुद्धि पर्वा केली नसती
कां धूसरतेला उषा आम्हीं समजावें ?
अन् अंधाराचे पोवाडे कां गावे ?
आम्हि अंधाराचा सदा करूं धिक्कार
अन् स्वप्न कालचें करूंच तें साकार

****

# .५५. ब्रह्मा, विष्णु, महेश




*जय जय राम कृष्ण हरी—राम राम राधे कृष्ण हरी*
*राम राम राधे कृष्ण राधे—शेतकरि भोळे कृष्ण माझे*
*भोळा राजा कुणाचे हरे राम—राम राम राजा कुणाचे हरे रा*

काळ्या आइचा सखा पुत्र तूं तूंच खरा घनश्याम
ब्रह्मा होउनि तूंच निर्मिलें निर्मियलें जग सारें
दरी डोंगरी फोडुनि सगळें विश्व सजविलें न्यारें
गाळुनिया तूं घाम......राजा कुणबि हरे राम

विष्णु होउनि तूंच पोशिलें पोशियलें जग सारें
तुरे माळ ओसाड या इथें उभीं धान्य-कोठारें
नामानिराळा राम......राजा कुणबि हरे राम

महादेव तूंच पार्वतिशंकर-रूप कधीं तव महा भयंकर
त्रिभुवन जाळुनि भस्म लावुनि
पुनः तूं भोळा सांब–तूंच तो राजा कुणबि हरे राम.

नाहीं तुला टिचभर निवारा तोच ब्रह्म तूं कां ?
नाहिं तुला कुटकाही खायया विष्णु उपाशि उभा
नाहिं तुझ्या हातिं मृत्यु राहिला रे भोळ्या सांबा
घालुं लागले नीच दैत्य या जगामधें थैमान
उठ रे राजा कुणबि हरे राम...राम राम राजा कुणबि हरे राम

घे हातीं या साऱ्या जमिनि घे ब्रह्माचा अवतार
पहिले खा तूं विष्णु होउन जगुन जगाला तार
उघड नेत्र तो तिसरा भयंकर लाले लाल अंगार
ऐतखाउंचें कर निर्दालन घेइ रुद्र अवतार
ऊठ हे सर्वव्यापि भगवान–माझ्या राजा कुणबि हरे राम

गदा, चक्र अन् त्रिशूळ झालीं जुनीं तुझीं अवजारें
शंख डमरूचा आवाज ये ना ठेव तूर्ते तें सारें
पद्म पोथिचीं गळलीं पानें नको सर्प निष्प्राण
घेई आतां ही एकजुटीची मशाल उचल निशाण
माझ्या राजा कुणबि हरे राम......

****

# .५६. जागी झाली मानवता –

जागी झाली मानवता ही आळवील रे राग, गाइल ओकुन आग ॥ ध्रु० ॥

मानव आला कां जन्माला दुःख जुलुम केवळ सहण्याला ?

ही दुनिया जहागीर दिली का कुणी कुणा जहागिरदाराला ?

आम्हां वगळुनी, मिळविले कुणी जगीं ताज आणि राज ? ॥ जागी झाली ॥

मुठींत सागर थोर हिमालय ही ज्याची छाती

चंद्र, सूर्य झळके इतरांगत ज्या माथ्यावरती

तोच आज मी मानव पाण्याच्या थेंबास महाग ॥ जागी झाली ॥

ऋद्धि सिद्धि ना वनवूं शकलो जो धरतीचा दास

ओढुन आणिल स्वर्ग उद्यां जो मावळतीच्या आंत—

त्या दलिताची फुलवण्या निघे करपुनि गेली बाग ॥ जागी झाली ॥

दान कुणी देइल धनी, करुनि ठेवण्या आम्हा ऋणी

दानावरचें लाचार जिणें नष्ट करिल ही आज, चंद्रावरचा डाग

॥ जागी झाली मानवता—

****

# ५७. हैड्रोजन बॉंब

याला झोंपेंतच मारा
ठेचा झोंपेंतच याला
हैड्रोजन हा दुष्ट आहे
घात करील हें स्पष्ट आहे.
संगत येतें हसरें बाळ
त्याचाही हा होइल काळ
खलि नव तरुणींच्या गालीं
दिसेल कुंकू ज्या भालीं
क्षणांत टाकिल हा पुसुनी
लाखों कोसांवर बसुनी
हें डुलतें तें हिरवें शेत
खळ्यावरिल हा शेतकरी
उफणुनि पडलेली ज्वारी
त्याचि करिल हा राख पुरी
देवळांतली ती घंटा
मंजुळ नाद तिचा ऐका
मंजुळतेला त्या गाडून
हसेल हैड्रोजन बोका
ती अजान मशिदीमधली
जी पहाटेला जाग आली
त्या पहाटेवर हा फुटुनी
रात्र करिल हा सैतानी
किलबिल पक्ष्यांची होते
निर्झर जें गाणें गातें
चंद्राची शीतल छाया
सूर्याची जीवनमाया

बेचिराख हा करील ही
म्हणुनिच मी फोडित टाहो
गेला झोपीं तो मेला
मारूं नये मेलेल्याला
सुंदर आहे तत्त्व खरें
मारूं नये झोपल्या नरें
परि हा निद्रेंतच मारा
तत्त्व नवें हें स्वीकारा
निद्रिस्तच हा असतांना
सुरमळाल त्याच्या माना
भविष्य देइल तुम्हा दुवा
हाच आखावा मार्ग नवा
हैड्रोजन जागा होता
नष्ट करिल ही मानवता
भविष्य कुठलें मग पुसता
मार्ग कसा येइल हाता ?
म्हणुनिच निजल्या जागीं हा
ठार करारे ठार करा
याला झोपेंतच मारा
ठेचा झोपेंतच याला.

****

## .५८. गाढवास उद्देशून

स्वामिनिष्ठेचें स्तोम माजवून जनसाधारणास लाथा झाडणाऱ्या गाढवास उद्देशून—

हक्कासाठीं लढणाऱ्यांना मूर्खांनो मारा लाथा
लढणाऱ्यांना खंत न त्याची मार्ग आपुला आक्रमिता
तेही देतिल लाथांना पहा उरले आशेचे विरलेले
कचऱ्याविण पडलेले फुंका फुंकु निखारे उकीरडे
आणि पोसले जाऊं द्यात कुंभाराघरचें जितें मढें
मेरे मेरेतों काम करा विश्रांती घेऊं नका जरा.
वहावयाला दगड न् माती धन्यासाठिं या त्वरा करा
खात रहा सोडगे निघूं द्या पोंक वसूं द्या कंबरडें
पुन्हा खडी ताजीम द्यावया चटकन् व्हारे धन्यापुढें
कुणी तुम्हां लाचार म्हणावें ध्येयाचे मेरूच खडे
पदक स्वामिनिष्ठेचें देइल साक्ष होउनि जगापुढें
उदो उदो होईल खचीतच स्वामिकडोनी कधींतरी
पितर पोचतिल मग स्वर्गाला होइल आशा तीहि पुरी
अन् ठेवा रे सांगाडे आपुले जपोनी याहि पुढें
'कधींतरी' घालतील हातीं ते सोन्याचें छान कडें

****

# ५९. रात्र आहे वैऱ्याची

रात्र आहे वैऱ्याची जागा रहा, —जागा रहा

काल लाल किल्ल्यावर आपुला रोविला तिरंगा
हुतात्म्यांनिशीं झुंज दिली रक्ताची वाहुनि गंगा
तो जळाया आज पेटवी शत्रू जातिय दंगा
संघराज्य धोक्यांत आहे रे तुझी दिल्लीची गुहा,—जागा रहा

झेंड्याची काठी पोखरण्या शिरले कांहीं किडे
विजयध्वजा गगनांत डोलता तळमळुनी तडफडे
पिसाळले सूर्याजी तेही संधि शोधण्या खडे
अग्र लागली पणास जनताजनार्दना तूं पहा, —जागा रहा

कंसानेंही कपट योजिलें कृष्ण जन्मण्या आधीं
कारागारीं वहिण देवकी, तिच्या भोंवतीं प्यादीं
पुतना लोळुनि सरंजामदारीची शोभवी गादी
नवस्वतंत्रता-कृष्ण मारण्या शत्रू सजला पहा, —जागा रहा

साम्राज्याच्या छुप्या दलालां अन् जातियवाद्यांना
कोटि हातांची मूठ बांधुनी काढ झोडपुन त्याला
स्वैर लहरूं दे ध्वजा दिल्लिवर साद घाल दिल्लीला
संघराज्य-जनशक्ती पाठिशी तुझ्या उभी ही पहा,—जागा रहा

****

# ६०. गांधीजींचें बलिदान

गांधीजींच्या बलिदानांतुन हांक आली ऐका
लोकशत्रु साधण्या बैसले अजूनिही मोका

किलि दाबिली ज्यानें साम्राज्यावरी लढण्याची
प्रतिकारानें अन्यायाचे बांध फोडण्याची
जातियता भस्मसात् करि जो सदा नभीं तळपून
आज दिसेना दिवाभितांनीं दगाळला जाऊन
चोहिकडे अंधकार समजुनि बावरला हो कां ?
लोकशत्रु साधण्या बैसले अजूनिही मोका

गांधीजींवर वार नाहिं हा जनतेवर हल्ला ,
निरखा रे हा करावयाला कोण कसा धजला ?
जातियवादा मागें राजा, धनिक आहे दडला
देवळांतले कांहिं पुजारी सामिल चोराला
" होतांच क्षणीं अंधार
करूं जनतेवरती वार "
मांडे मनांत खाऊन
घेतलि त्यांनि तल्वार
धन्य तुझी क्रोधाग्नि केली त्यांचि भस्म नौका
लोकशत्रु साधण्या बैसले अजूनिही मोका

दृष्टिआड होतांना रविनें दिलें रक्त उधळून
हिंदु-मुस्लिम एकजुटीची मशाल तेजाळून
मावळलाही सूर्य उगवला उरां तुम्ही ठायें
मग कां रे आम्हि रडत बसावें अन् ठेपाळावें ?
घ्या मशाल ती तेजाळ
पेटवा पुन्हा स्वान्तरीं
पाहुनी तेज रक्ताचें
तेजाला लागो कांटी

मशाल मोर्चा एकजुटीचा चौंहिकडे फेका
लोकशत्रु साधण्या बैसले अजूनिही मोका

जातियवादी दिवाभितें मग शोधतील जागा
सत्ताधारी धनिकांच्या कुणी राजांच्या पागा
हुलकावणि देऊन कुणी देउळांत शिरतील
महादेवाच्या पिंडीमागें हळूच दडतील
लांचखाउ कोणि पुजारी
ते दया, क्षमा जपतील
वडवेगिरि करुनी कोणी
ही मशाल हिसकवतील
आश्रयदाते, छुपे पुजारी त्याहुनिही धोका
लोकशत्रु साधण्या बैसले अजूनिही मोका

गांधीजींच्या आत्म्या हातीं ऐक्याचीहि मशाल
दिसल्या जागा दिसले शत्रू तुडवित जाऊं खुशाल
लढतां लढतां मंगल तारा लाल नभीं येणार
रवि नव-तेजें लोकक्रांतिनें नटुन पुनः दिसणार
आघाडिला कामगार स्वागतिं वाजवील डंका
माय कुणाची व्यालि साधण्या कुठला मग मोका ?

****

# ६१. जय महाराष्ट्र

जय महाराष्ट्र संयुक्त महाराष्ट्राच्या गाऊं गाना
गाऊं उंचावुनी माना । घेऊं तानावर ताना

भाषेचा थाट मराठी । अहिराणी कोंकणी घाटी
शब्दोच्चाराची खोटी । शत्रुला वाटते धास्ती
ज्ञानेशापासुनि भिल वारली । घेई नित नवरसना
सौंदर्य महाराष्ट्राचें । क्षणक्षणा प्रत्यया येतें
माती सुगंध उधळीते । दरिकपार रिझवि मनातें
गोमांतक, वेरुळ दावि अजंठा । अमर मानवी स्वप्ना
जय महाराष्ट्र

कोयना नी गोदा, कृष्णा । भागवुनी आमुची तृष्णा
उदरांत मोतीं पिकवोनी । महाराष्ट्र उभा सुखवोनी
कधीं उग्ररूप खंदकरूपानें पाणी पाजी शत्रूंना
जय महाराष्ट्र

जणु संताजी अन् बाजी । सह्याद्री सातपुडादी
आजही छाती उघडोनी । गर्जतसे पर्वतराजी
घाला घण अमुच्या छातीवर अन् पाहा मराठी बाणा
जय महाराष्ट्र

या पर्वतराजी कसल्या । कर्वतीच तापविलेल्या
महाराष्ट्राभोंवतीं पसरल्या । अरिसेना ज्यांनीं चिरल्या
ही परंपरा घेऊन मिरवितो । आमुचा शिवबा तान्हा
जय महाराष्ट्र

अन् इतिहासाचीं पानें । भरलीं सारीं अभिमानें
शतकानुशतक पहा वळुनि । लिहिलीं आपुल्या रक्तानें
घेऊन स्फूर्ति त्यांतून जागवूं जगत्-शक्तींना
जय महाराष्ट्र

कानडी, हिंदी, गुजराथी । आंध्र ओरिसाही साथी
राखुनी त्यांच्या हवाला । बांधुनि लोकराज्याला
मुंबईपासुनी नागपूर सुखसमृद्ध नांदु सकलांना

जय महाराष्ट्र

स्वातंत्र्य मिळता स्थापूं । अजये पण त्यानें व्यापूं
फडकवूं ध्वज समानतेचा । पर्वा न जिवाची करतां
संयुक्त महाराष्ट्र साधवूं । विभक्ताप्रत वदतांना

जय महाराष्ट्र



## ६२. गोव्याकडे—

स्वातंत्र्याच्या भाजिभाकरिंत सांपडतां रे अजुनि खडे
वेचुनि काढा; मत्त पोर्तुगिझ मुळासकट अन् चला पुढें
व्हारे पुढें अन् चला पुढें ॥ ध्रु० ॥

एक भारतिय जोंवर राहिल गुलामगिरिच्या बंधांत
तोंवर कुठला घास सुखाचा कोण असे आनंदांत ?
फिरंगि साम्राज्याचे मिळवूं धुळींत उरले कोट खडे
वेचुनि काढा; मत्त पोर्तुगिझ मुळासकट अन् चला पुढ
व्हारे पुढें अन् चला पुढें ॥ १ ॥

दख्खनचें नंदनवन आमुचें खाण हुजी सौंदर्याची
ताड, माड, दुधसागर शोभा निळ्या मनोहर दर्याची
आमुचें अंगण आम्हांस बंधन न्याय अजय दृष्टीस पडे
वेचुनि काढा; मत्त पोर्तुगिझ मुळासकट अन् चला पुढें
व्हारे पुढें अन् चला पुढें ॥ २ ॥

तसूभरहि धरतीवर आमुच्या हक्क कुणी जर सांगेल
शत्रू ठरनी मोल जिवाचें तयास द्यावें लागेल
धरती आमुची फक्त मागते, शत्रूचें गाडण्या मढें
वेचुनि काढा; मत्त पोर्तुगिझ मुळासकट अन् चला पुढें
व्हारे पुढें अन् चला पुढें ॥ ३ ॥

पक्ष, पंथ, धर्मभेद सारे आम्ही झटकुनि टाकियले
हेरुनि शत्रू फ्रेंच, पोर्तुगिझ पाणिहि त्यांचें जोखियलें
यश हें आमुच्या पायाखालीं, उठा चला रे गोव्याकडे
वेचुनि काढा; मत्त पोर्तुगिझ मुळासकट अन् चला पुढें
व्हारे पुढें अन् चला पुढें ॥ ४ ॥

****

# .६३. 'ज्ञ' वर मोर्चा

नकोस हिणवूं पाटीवरली
वेडिवाकडी रेघ पाहुनी
भल्या माणसा नकोस समजूं
जातच याची मूळ अडाणी
या धरतीची काळी पाटी
रे जेव्हां मी हातीं घेतों
*तिफणीची पेन्सिल पाटीवर
धरून जेव्हां रेघ ओढतों
निसर्गसुद्धां लुब्ध होउनी
रानोमाळीं फुलून गातो
अन् त्या रेषेंतच मग हिरवीं
आशीर्वचनें भरून जातो
" जीवन जग तूं अभिमानानें
तसेंच जीवन दे जगताला "
पुरे कराया या वचनाला
दक्ष शेतकरि होउनि जातों
शेतकरी जें हातीं घेतो
करण्या त्याचा शेवट पुरता
कधिं नच तो माघारा येतो.
नांगरलीया अर्ध्या शेता
धिमेपणा हा पिंड आमुचा
जें देहाला कष्ट मानितो
निर्धाराचें कुंपण भक्कम
कृतीभोंवतीं अमुच्या शेतीं
ज्ञानदृष्टीनें 'ढ' ते आम्ही !
कुणीहि यावें नाडायाला
आज घेतली पाटी-पेन्सिल
'ज्ञ' वर मोर्चा बांधायाला.

---

*तिफण-पेरणीचें अवजार.

****

# ६४. आदेश

आदेश, आदेश, हे शिवराया देई मला आदेश
तूंच सह्यगिरि कठोर, निर्घृण फत्तर काळा वरुनी
खडकाखालुन झुळझुळ निर्झर तूंच आळविशि गाणीं
तूं ज्ञानेश्वर, एका, तुकाची अभंग समर्थवाणी
तुझ्या भागवतिं ठायीं ठायीं मानवतेच्या खाणी
भिमातटाकीं दिसे तुझा मज अजब आगळा वेश

गोदा, कृष्णामाईचें तूं पवित्र, निर्मळ पाणी
वहाती प्रवरा, निरा, कोयना तुझें रूप घेवोनी
नदीकाठिं फुलतो डुलतो तूं उधळित सुगंध गगनीं
जाई, जुई, शेवंती, केवडा तूंच आमुच्या रानीं
तूंच केवड्यामागिल महाराष्ट्राचा रक्षक शेष

दिससि मावळा कधीं घोंगडी आणि लंगोटीवाला
कधीं शोभशी मर्द मराठा हातीं घेउनी भाला
जया पाहुनी धसका बसतो कृतांत कलिकाळाला
झोपेंतच तो बडबडतो मग आला मराठा आला
तुझाच वंशज आज मराठा बने मूढ वा मेष

दे आदेश असा कीं हा तव महाराष्ट्र शोभावा ?
गजगंडस्थळ छेदित राहो तुझा मराठी छावा
करवंदीच्या पानांना आकार पुनः तो यावा
तलवारीचें पातें समजुन अरि थरथर कापावा
काक, गिधाडांचा नच वाटो आम्हास मत्सर, द्वेष

जगा पटूं दे शिववंशाला ठाउक ना माघार
निर्मुनि नव-महाराष्ट्र स्वप्न तव करूं दे रे साकार
कूपमंडुक न ठरो मराठा ठरो पुनः दिल्दार
हिंद रक्षिण्या तुझी झळकुं दे जय भवानि तल्वार
दिल्लिश्वराची लाज राखण्या मराठ्यांस दे त्वेष

****

## .६५. प्रणाम

हिंदी-संघ-राज्याच्या जन-आत्म्या तूं घेई प्रणाम
पराधीन जगताच्या दुर्दम दोस्ता घेई प्रणाम
महाराष्ट्र, गुजराथ, आंध्र, कर्नाटक, तामिळनाड
तसेंच केरळ, आसाम, ओरिसा, राजस्थान, बिहार

उगवतिचा पंजाब
मावळतीचा वंग
लुकलुकतीं रत्नें
उधळित नित-नव रंग

स्वतंत्र होतिल अधिकच खुलतिल दिपेल दुनिया
पाहुनि तव बलिदान् — घेई घेई प्रणाम
कलिकाळाची मगरमिठी तूं छिन्नभिन्न केली
दीड शतक जो मूर्च्छित मानव जाग त्यास आली

टोकिल आरोळी
हा प्रातःकाळीं
वृद्ध, तरुण, बाळें
उठतिल या वेळीं

नव्या यशानें, नव जोमानें, गातिल गाणें
करावया बलिदान् — घेई घेई प्रणाम
साम्राज्याला जरि यश आलें चिरावया पंजाब
सिंध, पठाणा अलग लावण्या वंग भूमिला आग

भगतसिंग आत्मा
दुभंग होइल का ?
स्वप्न रविंद्रांचें
विरून जाइल का ?

टाकूं किमया, स्वयंनिर्णया, ऐक्य कराया
करूं जिवाचें रान — घेई घेई प्रणाम

उरल्या सुरल्या साम्राज्याला देऊं मूठमाती
शरण आणूं हे पोर्तुगीज पण तृण धरूनी दातीं
मंत्र दिशा दाही
संपूर्ण लोकशाही
हिंदि ऐक्य स्थापूं
हीच पुनः ग्वाही
धनिकशाहिला, गुलामगिरिला, जातियतेला
ना थारा ना आराम — घेई घेई प्रणाम

कोण जिंकुं शकणार आम्हाला ॲटम, हैड्रोजन बाँब !
मैदानीं येऊं या घालुं आणिहि लोक जुटीचा बांध
तोफा, रणगाडे
इथेंहि लढतील
मानवशत्रूंचे
मुडदे पडतील
शस्त्रें घेऊं अस्त्रें घेऊं, जिंकुनि दावूं
मानव नाहिं गुलाम — घेई घेई प्रणाम

आणि शेवटीं अणु, परमाणू जनतेच्या सेवेला आणूं
संघ-संस्कृती नवीच आणूं नव-जनशक्ती हेंच सुकाणूं
खुलवूं जीवन बाग
लागुं जुन्याला आग
नव्या जगापुढती
नवा आळवूं राग
स्वतंत्र राहूं, समता ठेवूं, यशास गाऊं
आण घेइ जन आम — घेई घेई प्रणाम.